# कलावन्तीण

संगीत नाटक

अंक १ ते ३

---

लेखक

विनायक आत्माराम पाठारे

[ सं. दत्तक-सून, सं. शहाण्यांचा बाजार, वाः रे श्रीयुत,
पांढरपेशा इ. नाटकांचा कर्ता. ]

---

सन १९३७

किंमत आठ आणे

# दोन शब्द

**दे. भ. बॅरिस्टर बाबासाहेब जयकर** यांनीं व इतर विद्वानांनीं वाखाणलेलें "हिंदुसमाज आणि पतित स्त्रियांची सुधारणा" हें माझें पुस्तक लक्षांत घेऊन, या विषयावर नाटक लिहिण्याला माझे दिल्दार मित्र 'प्रबोधन'कार **श्री. के. सी. ठाकरे** यांनीं मला सूचना केली नसती, तर आजचा हा योगायोग कदाचित् येता ना; इतकें सांगितलें म्हणजे **श्री. ठाकरे** यांच्या ऋणांतून माझी मोकळीक होईल. चार वर्षांपूर्वींच हें नाटक रसिकांपुढें आलें असतें, पण मराठी रंगभूमीवर आलेला ग्रहदशेचा फेरा त्यालाहि बाधला! अशाहि परिस्थितींतून हें नाटक प्रयोगरूपानें व पुस्तक रूपानें आज रसिकांपुढें आलें ही समाधानाची गोष्ट होय. प्रस्तुत विषयाच्या अधिक खोलांत न शिरतां, माझ्या या कृतीबद्दल बरें किंवा वाईट मत बनविण्याचें मी रसिकांवरच सोपवितो; त्यांचा निर्णय हीच माझ्या श्रमांची फलश्रुति.

**चित्तरंजन नाट्य समाजाचीं** चालक मंडळी **श्री. विनायकराव झावबा, श्री. विठोबा झावबा, श्री. मोरेश्वर मानकर, श्री. यशवंतराव जयकर, श्री. पांडोबा विजयकर, श्री. चंद्रसेन नवलकर** व **श्री. शंकरराव चव्हाण** यांनीं माझ्याबद्दलचा अभिमान व्यक्त करून नाटक रंगभूमीवर आणण्याचा जो दिल्दारपणा दाखविला, त्याबद्दल त्यांचे आभार मानावे तितके थोडेच होतील. **श्री. विठोबा झावबा** यांनीं नाट्यप्रयोगाच्या दृष्टीनें गेल्या चार वर्षांत वेळोवेळीं ज्या कांहीं सूचना केल्या व नाटक बसविण्याच्या बाबतींत जे श्रम घेतले, त्याबद्दल त्यांचा मी फार फार आभारी आहें. माझे साहित्यिक मित्र व सं. 'कांचेचें घर' या नाटिकेचे कर्ते **श्री. सुंदर मानकर** यांनीं माझ्या अनेक अडचणी लक्षांत घेऊन नाटकांतील बरीचशीं पदें रचून दिल्याबद्दल त्यांचे आभार मानणें शब्दातीत आहे.

प्रस्तुत पुस्तक वेळेवर प्रसिद्ध व्हावें, म्हणून **विजयानंद** प्रेसचे मालक श्री. गोविंदराव चेऊलकर, **रेक्स स्टुडिओचे** श्री. राजाध्यक्ष व **यशवंत आर्ट ब्यूरोचे** श्री, मातोंडकर या माझ्या मित्रमंडळींनीं जी कळकळ दाखविली तीबद्दल त्यांचाहि मी अत्यंत आभारी आहें.

२१–डी, गांवदेवी रोड,
**मुंबई नं. ७.**
ता. ६ सप्टेंबर १९३७.

सर्वांचा नम्र,
**विनायक आत्माराम पाठारे.**

# रंगभूमीवर
# व रेडिओवर
# गाजलेली

## वैवाहिक जीवन आणि घटस्फोट

या प्रश्नांचा विचार करायला लावणारी

याच लेखकाची

### संगीत नाटिका

# दत्तक-सून

# श्री. विनायक आत्माराम पाठारे यांचा
# गेल्या १५ वर्षांतील वाङ्मय-संसार.

विवाहविधींची कुतरओढ
पितृपक्षांतील पितरांचे पिण्ड
शंखध्वनि अर्थात् सम्पादकाचा महिमा
हिन्दुसमाज आणि पतित स्त्रियांची सुधारणा
मेलेल्या नाटककारांचें जिवन्त नाटक ... विनोदी संवाद
रंगभूमीवरील व्यासपीठ
कै. आ. मो. पाठारे ( सं. 'संभाजी' कर्ते ) यांचें चरित्र

| | | |
|---|---|---|
| सं. कलावन्तीण | .. ... | सामाजिक नाटक |
| सं. वा: रे श्रीयुत | ... ... | ,, ,, |
| सं. पांढरपेशा | ... ... | ,, ,, |
| सं. दत्तक-सून | ... ... | ,, ,, |
| सं. शहाण्यांचा बाजार | ... | ,, ,, |
| सं. नको तें लग्न | ... ... | ,, ,, |
| सं. स्वर्गारोहण | ... ... | पौराणिक ,, |
| वृथा नारी पतिव्रता ! ... | ... | शब्द-चित्र-मंजूषा |
| उद्यांचा महाराष्ट्र: जिता कीं मेलेला ? | | |
| रांगती लेखणी | ... ... | किरकोळ लेखसंग्रह |
| खरा हिन्दु | ... ... | दोन संस्कृतीचा समन्वय |

( *In Preparation* )

**PROSTITUTES** : THEIR GENUINE PURITY & PRESENT LIFE.

**MISSION OF OUR SAINTS:** Few snap-shots of their teachings with a stand-point of a Universal Religion ( Vishwa-Dharma. )

**ECLIPSE OF "-' ISMS " OVER INDIA:** A rational torch through the mazes of Indian cults and sects.

पत्ता:—२१-डी, गांवदेवी रोड, मुंबई. नं. ७.

# चित्तरंजन नाट्य समाज

या संस्थेनें या नाटकाचा प्रथम प्रयोग सुप्रसिद्ध ॲडव्होकेट **श्री. सुशिल श्रीनिवास कवळेकर** एम्. ए., एल् एल्. बी. याच्या अध्यक्षतेखालीं ग्रँटरोड बॉम्बे थिएटरांत सोमवार ता. ६ सप्टेंबर १९३७ रोजीं दिवसा केला त्यावेळीं ज्या नटांनीं भूमिका केल्या त्यांचीं नांवें साभार नमूद करण्यास आनंद वाटतो.

**खांसाहेब**—श्री. काशिराम गांधी

**सतीश**—श्री. चुनिलाल धुरंधर

**सुंदरराव**—श्री. विठोबा झावबा

**श्रीरंग वेरेकर**—श्री. शंकरराव खातू

**माधवराव**—श्री. मोरेश्वर कोठार

**रमाकांत**—श्री. यशवंत जयकर

**कांतीलाल**—श्री. शरश्चंद्र पोवळे

**हिरालाल**—श्री. मोरेश्वर मानकर

**कृष्णा कवळेकर**—श्री. चंद्रसेन नवलकर

**वत्सला वेरेकर**—श्री. नारायण मानकर

**सुशिला वेरेकर**—श्री. वसंत मोहिले

**नीरा नानोडकर**—श्री. पांडुरंग विजयकर

**यमुनाबाई**—श्री. गोपाळ फाटक

**रामराय म्हापसेकर, चंद्रकांत, वसंत विश्वनाथ, पारशी, वगैरे.**

**पेटीवाले**—श्री. आत्माराम म्हापसेकर

**तबलजी**—श्री. आत्माराम वेलींगकर

**मॅनेजर**—श्री. शंकरराव चव्हाण.

॥ ॐ श्रीसरस्वत्यै नमः ॥

# कलावन्तीण

## अंक पहिला

### प्रवेश १ ला

[ **स्थळः**—वत्सलेचं घर. वस्तादजी व तबलजी हत्यारं लावीत आहेत; **वत्सला** प्रवेश करते. गाणें संपतें तों **नीरा** येते. ]

**वत्सला**— अब-ब-व ! कुठं ग तुझा पत्ता सायबिणी ? कशी आहे तुझी खबरबात ?

**नीरा**—बरी आहे साधारण.

**वत्सला**—बाकी चाललंय कसं काय ?

**नीरा**—चाललंय असंच. खरं म्हणशील तर तसा कोणाचा कायम आधार नाहीं. आणि रोजचा खर्च थांबतो थोडाच ?

**वत्सला**—तसं कोणी नाहीं कां अजून तुला ?

**नीरा**—अग सगळ्या वाऱ्यावरच्या वराती ! खुशालचंदाचा सगळा बाजार ! बरं वळखीचं तसं कोणी आलं तर दिडकीची कमाई नाहीं. बाता शेकड्याच्या नि हजाराच्या. अशा स्थितीत आमच्या सारख्यांना दिवस

काढायचे आहेत. वेळच, बाई, मोठी चमत्कारीक आली आहे. आपली पहिली स्थिति कांहीं तरी बरी होती; पण आतां मात्र रस्त्यावर पडण्याची वेळ आली आहे.

**वत्सला**—हो ग, असंच झालं आहे चारीकडे. भल्याबुऱ्याची एकाच परीनं वाट लागत चालली आहे आज.

**नीरा**—अग पण सुशीला नाहीं कुठं दिसत ती ?

**वत्सला**—खरंच सांगू नीरा, मला तर कंटाळा आला आहे त्या कारटीचा. आजकाल ती फारच मस्तवाल बनली आहे. आणि या सगळ्या गोष्टीला कारण म्हणशील तर आमचा श्रीरंग. आमच्या घरांत शिक्षणाचं वारं खेळूं लागलं खरं, पण त्या बरोबरच मला माती खायला लावणारी अवदसाहि शिरूं लागली आहे घरांत. श्रीरंगाचा दोस्तदार तो सतीश—

**नीरा**—बरं, त्याचं काय झालं ?

**वत्सला**—तसं नाहीं कांहीं विशेष. पण सांगायची गोष्ट म्हणजे अशी, कीं बारान् बारा चोवीस तास असतो तो इथं पडलेला. खरं म्हणशील तर हा चांगल्या गृहस्थाचा मुलगा. बोलूनचालून नायकिणींचें घर हें. बरी वाईट माणसं येणार आमच्याकडं. यानं नको का थोडा तरी दूरवर विचार करायला ?

**नीरा**:—वत्सल्या, अलीकडे मी आपली पहातें, ही शिकलींसवरलेली तरणीताठीं मुलं थोड्याशा ओळखीचा फायदा घेऊन, आमच्याकडं आपली सारखी ये जा करूं लागतात. देणं नास्ती घेणं नास्ती. भलत्या वेळीं येऊन तासन् तास खुर्च्या अडवून बसतात; कुणी पाहिलं, तर त्याला खरोखर असं वाटेल, कीं हे जसे कांहीं आमचे पोशिंदे शेठच. शरम देखील वाटत नाहीं पाड्पडलेल्यांना !

**वत्सला**:—पण नीरा, तूं म्हणतेस तसा नाहीं बरं तो सतीश. गुणांनीं चांगला आहे. विचारीहि आहे. चार पांच वर्सं झालीं त्याचा आमचा परिचय होऊन; पण त्याचं उरफाटं वर्तन नाहीं, कीं वाईटसाईट बोलणं नाहीं. आणि तसं म्हणशील तर मला तो चांगला मान देतो.

**नीरा**:—पण त्याला स्वत:ला नोकरीधंद्याचा आधार नको ?

**वत्सला**:—तो स्वत: हुशार आहे; कुठंहि मिळेल त्याला चांगली नोकरी. नाहीं तरी त्याचं घरचं उत्पन्न कांहीं कमी नाहीं. पण अलिकडे सुशिलेची नि त्याची घसण बरीच वाढली आहे. त्यांचे सगळे ढंग घरीं-दारीं चालू आहेत. आपला धंदा कलवंतपणाचा. हिचे असले प्रकार कोणी पाहिले तर या भवानीला रस्त्यांतला भिकारी देखील पुसायचा नाहीं. आपल्या धद्यांत पाऊल टाकण्याचं आंतां हिचं वय.

**नीरा**:—पण काय गे, ती लग्नि कां करणार आहे त्याच्याबरोबर ?

**वत्सला**:—अग पण असं बघ, कीं तो चांगल्या कुटुंबांतला मुलगा; नायकिणीच्या मुलीबरोबर लग्न करणं त्याला साधेल तरी कां? अग, अंगांत तरुणपणाचा जोर आहे. तोपर्यंत वाटेल तें मनोराज्य करील. हिच्या पदरांत दोन अक्षरं पडलीं आहेत, तेव्हां तिला वाटतं व्हावं आपण गरति. त्यानं हिला लग्नाचं वचन देणं हा काय पोरखेळ कां आहे ? तरुणपणाचा मतलब साधण्यापुरता हिला दोन दिवस थापा देईल, गोड गोड वचनं देईल, शपथा घेईल, आणि हौस पुरवून शेवटीं आपलं तोंड कायमचं काळं करील ! आपल्या गोमंतक मराठा समाजांत अलिकडे लग्नाचीं वावटळ उठली आहे ना, तिचा हा सारा परिणाम !

**नीरा**:—वत्सल्या, नीट विचार करून कांहीं वळलं तर बघ. सुशिला कांहीं गाणंबिणं शिकते आतां ?

**वत्सला**:—गाणं ?—सगळं झालं पुरं ! माझ्याबरोबर वस्तादजीकडे चार दिवस जेमतेम बसली; आणि पुढं तालमीच्या वेळेवर बाहेरच जाऊं लागली. तिला गाणंबिणं कांहीं नको. सतिशाबरोबर बाहेर फिरणं, नाटक सिनेमाला जाणं आणि घरांत असली, तर बुलबुलतरंग वाजवणं हेंच तिला पसंत. मनांत येईल तसं वागते. पहाते आणखी थोडे दिवस वाट; नाहींतर तिला गांवचाच रस्ता धरायला सांगते; मी तरी किती सांभाळूं यांना आतां ?

**नीरा**:—माझं कसं झालं तें ठाऊक नाहीं तुला ? त्या मेल्या कथ्थकानं दोन तीन नाचाचे तोडे व चार पांच ठुंबऱ्या शिकवून जो गेला गांवाला, तो मेला बेपत्ता !

**वत्सला**:—अग पण कलवंतपणाचा आपला जन्माचा धंदा. शेटींच्या दोन पैशावर आपला संसार चालणार; आज जगाची स्थिति बदलल्यामुळं त्या लोकांचे व्यापारधंदे नीट चालत नाहींत; आणि त्यामुळं आपल्यासारख्यांना होणारी दोन पैशांची प्राप्तीहि मंदावली. जवळ विद्या असली, तर पोट भरण्याला कांहीं आधार तरी होईल. नीरा, दुसरी गोष्ट सांगायला हरकत नाहीं. पांच सहा महिने झाले; त्या कांतीलालचा इकडे पत्ताच नाहीं.

**नीरा**—अग सांगतेस तरी काय हें ? त्यानं तुला सात आठ वर्सं ठेवली होती ना ग ? तो मनुष चांगला असून असं कसं झालं हें ?

**वत्सला**—अग तो सज्जन खरा; पण अलिकडे आठ आठ, बारा बारा दिवस त्याचं इकडं येणंच नाहीं. बरं, कायमचा सोडून जाता, तर दुसरा मार्ग तरी बघतां आला असता.

**नीरा**—अग खरं म्हणशील तर आतांचे हे शेटीच असे लबाड झाले आहेत. दोन चार दिवस रुबाबानं येतील; मिठास भाषेंत पगाराच्या गोष्टी करतील; श्रीमंती दाखवायची म्हणून नुसती पानाची पट्टी खाऊन आंगावर पांच दहांची नोट फेकतील; 'अमक्या नायकिणीला मी अमुक वर्सं ठेवली नि तमकीला मी तसा पगार दिला', अशा बाता मारून, आमच्यावर छाप बसावी म्हणून, गल्लीगुच्चींतल्या दोन चार जणींच्या मोठ्या वळखी सांगतील. पगार देण्याच्या थापा देऊन जातील ते पुन्हां दिसायचे नाहींत मेले.

**वत्सला**—अग मी त्याला रोकडं सांगितल्या दिवसापासून माझ्याकडं येण्याचा तो बंदच झाला.

**नीरा**—पण त्या दिवशीं मी मोगा मालपेकरणीकडं गेली होती, त्यावेळीं तिच्याकडं त्याला नि त्याच्या एका दोस्तदाराला पाहिलं मी.

**वत्सला**—खरं म्हणशील तर त्याची आतां मला आशाच राहिली नाहीं तो आतां असाच घरोघर भटकत राहणार !




रामराय:—चेडवा, केन्नाच्यान् यादच ना माका. महालक्ष्मीचो प्रसाद हो. (पृ. ५)

**नीरा**—बरं, श्रीरंगाला कांहीं नोकरीबिकरी ?

**वत्सला**—छे; अजून काहींच नाहीं.

( **कृष्णा** येतो. )

**कृष्णा** - बायजी गो, म्हापशालो रामराय येयलो.

( **रामराय** प्रवेश करतो. )

**वत्सला**—बस मरे. गांवसून कधीं आलस तूं ?

**रामराय**:—पैर.

**वत्सला**:—कोणाकडे उतरलास ?

**राम**:— वेलींगकरांकडे.

**वत्सला**:—तूं एकटाच आलास मरे ?

**राम**:—ना. व्हांगडा दत्तीक हाड्ला. ताची कायी सोय करून दोन अडीच मयीन्यानीं वच्चन परत. हे पळे वत्सल, तुज्याकडे माजी एक विनंती आसा.

**वत्सला**:—कसली मरे ?

**राम**:—जरा अपूरबायेच्या नात्यान् कोणी मिळाल्यार पळे माज्यार तुजे अनंत उपकार जातले.

**वत्सला**:—राममामा, तुला वेड लागलंय ! अरे,या मुंबईत आमच्या धंद्याचे आतां चारी वाटांनीं बारा वाजण्याची वेळ आली आहे.

**राम**:—तशें ना गो; हांव तुजे कानार घातलें.

**वत्सला**:—राममामा, त्या वेलिंगकरांची बरीच वळख आहे. त्यांच्या त्या गोकुळीला सांग; ती करील कांहीं खटपट. दुसरी कसली खबर ?

**राम**:—चेडवा, केन्नाच्यान् यादच ना माका. ( खिशांतून पुडी काढतो. ) महालक्ष्मीचो प्रसाद हो.

**वत्सला**:—"आई श्रीमहालक्ष्मी, पाव गे तूं सायबिणी." राममामा, कालबिल नाहीं आलास ?

**रामः**—काल आमी ‘ **द्रौपदी** ’ सिनेमा पळोंच्याक गेलों.

**कृष्णाः**—अहा हा ! काय तो सिनेमा !

**वत्सलाः**—कितें झालें मरे ?

**कृष्णाः**—बायजी गो, माका एक मोठीच गम्मत वाटता ती अशी, कीं ‘ पंचकन्या ’ पैकीं त्या एकल्या द्रौपदीला पांच नवरे कसे ग ?

**रामः**—ये कृष्णा, पुता अशें म्हणूं नये. तें सगळें देवांदिकान् केलें मरे. अशें म्हणतां पाप लागतां पुता आपणाक !

**नीराः**—राममामा, पाप कसलें रे यांत ? कृष्णाली शंका अन् सवाल चूक मरे ? एकाच जन्मी पांच नवऱ्याबरोबर संसार करणारी द्रौपदी पातिव्रता, तर मग आम्ही कोण ?

**रामः**—अगो चेडवा, नायकीणी कलवतां—

**नीराः**—मग जिचा एक शेठ सुटला, दुसरा केला तो सुटला, तिसरा-चवथा व पांचवाहि सुटला, त्या नायकिणीला समाजानं कमी समजावी ?

**वत्सलाः**—( हंसून ) कसला ग हा वाद नीरा ? मला वाटतं वेड लागलंय तुला. रे कृष्णा, तुला सांगितलेल्या कामाला जाऊन लवकर ये.

**नीराः**—सांज झाली; जाते गे सायबिणी.

**वत्सलाः**—आतां केन्ना येता मगो ?

**नीराः**—येईन दहा बारा दिसान्. येता गो वत्सल्या.

**वत्सलाः**—ये गो.

**रामरायः**—पुता, माकासुद्धां एक दोन ठिकाणीं काम आसा. हांव वैतां हां.

**वत्सलाः**—ये मरे. (रामराय जातो. ) माझ्या आजच्या या स्थितींत सुशिलेला तरी चांगली बुद्धि येती तर बरं नसतं कां झालं ? असो; त्या मंगेशालाच सारी काळजी; तोच दूर करील ती.

पद १

आस एक देवा। भावी काला। सौख्य-संपदा दावा ॥धृ०॥ विमल चरणीं घनःश्यामा। पावन या करीं बाला। सुखवाया दीना या। तारी सतत अवतारी ईशा ॥ १ ॥

---

## प्रवेश २ रा

[ स्थळः—रस्ता. श्रीरंग येतो. ]

**श्रीरंग**—माझी सेकंड एल्‌एल्. बी. ची परीक्षा होऊन वकिलीची सनद केव्हां घेईन असं मला झालं आहे. माझ्या बहिणीच्या कमायीच्या पैशावर यापुढं जगणं ही गोष्ट माझ्या मनाला अहोरात्र बोचते आहे. बहिणीच्या देहविक्रयाच्या कमायीवर मी आपलं जीवन-यंत्र चालू ठेवणं हा चोख मार्ग म्हणतां येईल कां ?—छत्. तत्त्वतः पहातां, आम्ही एकाच आईच्या पोटीं जन्मलों; एकाच ठिकाणी वाढलों, शिकलों; वत्सलेनं आमचा सारा संसार चालवून माझ्या शिक्षणालाहि तिच्याच कमायीची मदत झाली; असं असतां, लौकिकाच्या नि नीतीच्या भलत्याच कल्पना उरापोटाशीं बाळगून, मी स्वतःच्याच घराची निंदा करीत बसणं केव्हांहि बरं नव्हे !

पद २

भूतकाला दूषण कां ?। नियती लिहित भालीं घटना दिसाव्या ॥धृ०॥ रूढी अंध सारी झाली। गमली मजसी या समजा नच माना ॥१॥

( **रामराय** येतो. )

**रामराय**--कोण श्रीरंग ? खंय अशिल्लो इतको वेळ ? घरां तुजी वाट बगली खूप वेळ अन् बाहेर सरलों; किदें करशें चल्ला तुजें नोकरीधंद्याचें ?

**श्रीरंग**--ठीक आहे. पण काय रे मामा, तूं असा मधेंच कां बरं आलास गांवाहून ?

**राम**--सध्यां येऊपाचो बेतच नाशिल्लो; पुणु सोनु बायेली तब्येत गेलीं दोन वर्सां बरी ऽऽ ना. घरांदराची वाट ती तशी लागली. माझेय हात पाय आतां चल ना. माझ्या डोळ्यांदेखत दत्तीची कांहीं सोय लागली म्हंजे मुंबईंत बिऱ्हाड करून सोनूंक हांगांच आणल्यार बरें पडलें. सधां तर माझो असो विचार ठरला. श्रीमहालक्ष्मी किदें करीत ते खरें !

**श्री०**--वाः छान ! तुझा हा प्लान तर फारच उत्तम आहे. बिनधोक व राजरोसपणानं असले धंदे करायला आपणाला कसली आली आहे हरकत ? दत्तीबरोबर आणखी चारचौघी तरुण मुली आणण्याचं तूं जरी पतकरलं असतंस, तरी या मुंबईच्या मार्केटांतून त्या मालाची उठावणी हां हां म्हणतां झाली असती ! शिवाय, निशाचरांना रासक्रीडा खेळायला गोव्याच्या गोपींचं इथं एक छोटसं वृंदावन थाटलं असतं !

**राम**--माझ्या सोन्या, हांव दत्तीची व्यवस्था लावूंक आयला म्हणून दुसऱ्याचा दलालीचो धंदो पत्करला ? घरांदारांचें आणि शेतीवाडीचें तें तशें झालें म्हणून तर हो विचार केला.

**श्रीरंगः**--अरे मला ते सगळं ठाऊक आहे. तिकडल्या तुमच्या शेतवाड्यांना किंवा घरादारांना आगी लागल्या, ती ओस पडलीं, तरी तरण्याताठ्या मुलीबाळींच्या जिवंत हुंड्या तुमच्या पाशवी तिजोऱ्यातून शाबूत आहेत, तोंपर्यंत तुमच्या पोटापाण्याची, चैनीची किंवा आयुष्याच्या विम्याची काळजी करण्याचं तुम्हाला मुळींच कारण नाहीं.

**रामः**--श्रीरंगा, तूं बऽऽरो शिकिल्लो भुरगो, आणि तूं अशें उरफाटें उलयतालें अशी माका कल्पना नाशिल्ली.

**श्री:**—गोमंतकांतील महाजनांनीं चालविलेली आमच्यावरील अरेरावी एक वेळ पुरवली; पण तुमच्यासारखे एकाच खाणीत पैदा झालेले उंदीर आपल्या आयाबहिणींचं, भाच्या-लेकींचं रक्त शोषून, त्यांची हाडंहि पोखरण्याला टपलेले आहेत, तोंपर्यंत आमच्या भगिनींचा नरकभोग चुकणार नाहीं.

**राम:**—बाबा शहाण्या, तुझो जन्मसुद्धां त्यांच नरकांत झाला! आजवर जिवंत राऊंक तुज्या शरीराचें झालेलें उदरपोषण सुद्धां तुझ्या आयाबहिणींच्या जोडीवर झालं हें तूं इतक्यांतच विसरलां दिसतां माकां. येस् फेस्ची दोन अक्षरां पदरीं पडतोक्षणीं मोठो पंडितशिरोमणी झालों तं! रांडेच्या पुतान् वेदांताची आणि पंडितगिरीची असली ही फुशारकी केन्नाच मारूं नये समजलो?

**श्री०**--अहो राजेश्री! हें पहा, वेश्याकुलांतील जन्माच्या नि त्यामुळं उत्पन्न होणाऱ्या कमस्सलपणाच्या भीतीला बळी पडणारा मी नव्हे. कर्तबगारीनं लौकिक मिळविणाऱ्याच्या कुळाचीं मुळं शोधणाऱ्या शास्त्रज्ञांना आजकाल कवडीचीहि किंमत राहिली नाहीं. कुलीन—अकुलीन या भेदांकडं बारकाईनं लक्ष देण्याचा काल मागंच मरून गेला. कुंतीपुत्र कर्ण यानं आपल्या कुलहिनतेचा कलंक स्वत:च्या कर्तृत्वानं सफाई धुवून टाकला कीं नाहीं? अमुक स्त्रिया किंवा अमुक पुरुष अमक्या एका कुलांत जन्मले, एवढ्याच एका गोष्टीमुळं सामाजिक दर्जाच्या दृष्टीनं त्यांचा बाजारभाव ठरविण्यांत आल्यामुळं आमचा सारा हिन्दुसमाज आज मोडकळीस आला! म्हणून म्हणतों, कीं उघडा, अजून तरी तुमचे डोळे उघडा नि आपल्या अज्ञान मुलीबाळींचा उघडा बाजार मांडण्याचं तरी बंद करा; त्यांना सुशिक्षित करून वैवाहिक जीवनाची दिशा दाखवा.

**राम०**- तुज्या त्या वत्सलेक शिकय आणि ताचें लगीन कर!

**श्री०**—तें माझं मी पहाण्याला समर्थ आहें. पण तुझ्यासारख्या परोपजीवी प्राण्याला असलं धंदे करण्यांत कांहींच शरम वाटूं नये?

**रामः**—ये शिरी, याद दवर लजबिज काढशील तर ! तुजें शाणपाण तुजेंकडे आसुंनी. तुज्या त्या बहिणीच्या जोडीवर पोट भरून व विद्या शिकून जगाक उपदेश करपाचो संभावितपणा करीत राव जन्मभर. जा, जा आतां गपचीप. ( जातो. )

**श्री०**—(हंसून)स्वारी तर खूपच संतापली ! आतां काय ? साऱ्या गांवभर माझ्या नावानें शंख करूं लागेल ! आमचे हे लोक मुंबईच्या बंदरांत उतरले, कीं गोव्यांतील व्यापाराच्या मोठमोठया गप्पा मारतात; पण यांचीं व्यापारीं कारस्थानं मात्र हीं अशीं !

पद ३

**नीच हे, कंद-कंदन करत निरंजन हे**
**सुख-भंजक ! ॥ धृ० ॥ निंद्य अती ! देह**
**विकुनी, बाला विरहत जीवन धरी अजि काला ॥१॥**

( घडयाळ पाहून ) अरेच्या ! या गडबडींत ५-३० वाजूनहि गेले !
( घाईने जातो )

---

## प्रवेश ३ रा

[ **स्थळः**—सुंदररावांचा दिवाणखाना. **यमुना** बसली आहे. ]

**यमुनाः**—मेलं डोकं कसं अगदीं फिरून गेलंय ! लग्नासंबंधीं सतीशाचे विचार काय आहेत ते तो एकदां स्पष्ट सांगता म्हणजे माझ्या मनाची हुरहूर तरी निघून जाती.

( **रमाकांत** येतो. )

**रमाकांतः**—काकी, सतीश आहे का घरांत ?

**यमुः**—आत्तांच कुठं बाहेर गेला.

**रमाः**—मी आलों होतों म्हणून सांगा त्याला.

**यमुः**—मला कांहीं तुला सांगायचं आहे. थांबशील कां थोडा ?

**रमाः**—थांबेन कीं. काय म्हणता काकी ?

**यमुः**—हें पहा, त्या रावसाहेबांच्या मुलीची पत्रिका येऊन जवळ जवळ दोन महिने झाले. मध्यंतरी त्यांच्याकडून चौकशी देखील झाली. सतीशाच्या होय म्हणण्यावर अवलंबून राहिलं आहे सारं. पुढल्या महिन्यांत मुहूर्त आहेत; तेव्हां म्हणल्यें मोठ्या थाटानं त्यांचं लगीन उरकतां येईल !

**रमा**—काकी, तुमचं सारं बोलणं आलं माझ्या ध्यानांत. लग्न व्हायचं आहे सतीशाचं; संसारहि थाटला जाणार आहे त्याचा; साऱ्या त्याच्याच हिताच्या गोष्टी होणार आहेत; असं असतां तुम्ही, त्याच्या आईबापांनीं, त्याच्याबद्दल काळजी घ्यावीत हें योग्यच आहे. त्या रावसाहेबांची ती मुलगी—

**यमुना**—नाहीं कां येत त्याच्या पसंत ?

**रमा**—छेः छेः; काकी, तसं नव्हे. भलताच समज करून घेऊं नका. हं पहा, रावसाहेबांच घराणं कांही कमी योग्यतेचं नाहीं. रंगारूपानं, शिक्षणानं त्यांची ती मुलगी सतीशाला नापसंत होईल असंहि नव्हे. तिच्या बुद्धिमत्तेबद्दल माझी तर पुरी खात्री झाली आहे. कॉलेजांत डिबेटिंगच्या वेळीं शंकाकुशंका काढून वादाला बसली, म्हणजे तिची ओघवती रसवंती पाहून सारे विद्यार्थी पोष्टाच्या खांबाप्रमाणं आ ऽ करून बसत ! मुलगी सगळ्या बाजूंनीं ठीक आहे; पण —

**यमु०**—पण—म्हणजे ? कांहीं भलतंच झालं होतं कीं काय तिचं ?

**रमाः**—आँ ! भलतंच कांहीं बोलूं नका काकी. कुणी तिसऱ्यानं असं हें ऐकलं, तर नसता दोष लागेल कीं त्या मुलीला ! हो,—पण काकी, तुमचा सतीश कांहीं सामान्य मुलगा नाहीं. त्याला सर्व कांहीं कळतं. पण आतांचा काळ बदलला आहे. आचार–विचार-स्वातंत्र्याच्या या काळांत आपली जन्माची जोडीदारीण पसंत करणं—नव्हे, ती शोधणं—अन् ती

जिवाची ज्योत जागती ठेवण्याकरतां स्वतःच्या जिवाचा आटारेटा करणं, या आतांच्या आम्हा तरुणांच्या धोरणाला तुम्हीं नांवं ठेवलींत तरी बहुजनसमाज मात्र त्याच दिशेनं वहात चालला आहे. काकी, मला किनई नाटक रचतां येत असतं, तर त्यांतलीं सारीं पात्रं अविवाहित अशींच मी दाखवलीं असतीं !

**यमु:**--म्हणजे असंच किनई, कीं आमच्या म्हणण्याप्रमाणं त्याला लगीन करायचं नाहीं ?

**रमा:**--असंच नव्हे केवळ. पण एकदां तो म्हणत होता, कीं आबासाहेब पेन्शनींत निघाले नाहींत तोंवर फिरून एकदां बी ए. ला बसेन. म्हणजे आणखी दीड दोन वर्षांनीं ठरवील नक्की.

**यमु:**--रमाकांत, अरे लगीन झालेले विद्यार्थी नाहीं कां पुढं शिकत ?

**रमा:**--शिक्षण, पदव्या नि विवाह यांचा गुणाकार करणाऱ्यांच्या गोत्रांतला तुमचा सतीश नव्हे. कॉलेजांतील वातावरणांत राहून नवाविचारांच्या बाबतींत शुद्ध नर्मदेचे गोटे ठरणाऱ्या तरुणांपासून दोन पावलं तो दूरच आहे. बरं, येतों मी. ( जातो. )

**य०**--ये बरं.

**सुंद०**--( आंतून येऊन ) काय ग ए, विचारलंस कां तूं त्याला ?

**य०**--हो, विचारलंय; सांगेन निवांतपणीं. पण होईल कां आपलं लवकर येणं ?

**सुंदर:**--किती मूर्ख बायको आहेस तूं ! कैक वेळां तुला मी बजावलं, कीं माझ्या जाण्याच्या वेळीं तूं आपल्या अकलेचे तारे तोडूं नकोस म्हणून, बायकोनं बायकोच्या मर्यादेंत राहण्यांत तिची शोभा असते समजलीस ? बजावून ठेवतों , कीं या पुढं अशा तऱ्हेनं वागलीस, तर मला आपला नवरेपणा गाजवावा लागेल !

**यमु:**--तेंहि बरोबरच. बोलूनचालून बायका आम्ही, गुलामगिरीशिवाय आम्हाला मार्ग नाहीं.

**सुंदर**—हें पहा, वायकांच्या दर्जाबद्दल किंवा त्यांच्या हक्कांबद्दल मला तूं कांहीं सांगूं नकोस.

पद ४

**अति फोल कां, बोल तव हे ? । काल बघतां । रुचति कुणा ? ॥ भार्या-पदा हंसती पहा ! ॥धृ०॥**
**करिसी उगा त्रागा हा । शिवलीच ना शंका तुला ॥ १ ॥**

बजावून ठेवतो, कीं यावेळीं तूं आपलं तोंड आवरून ठेव. ( टेलिफोन घेतो. ) हॅलो, कोण आपण ? — श्रीरंग ?—तो बाहेर गेला. हं, हं, सिनेमाला ? — पाथेला ? — 'A Way To Love' ? तुम्हीं दोघं आहांत ? अस्सं. ठीक. सांगेन हं. ( यमुनेस ) हा सारा तुझ्या लाडांचा परिणाम ! पहिल्यास त्याच्या ॲपॉइंटमेंट्स ? सिनेमाला— अन् तेहि कुणाबरोबर ? छेः छेः छेः, ताळ सोडला गाढवानं !

**यमुना**—अहो पण झालं तरी काय ?

**सुंदर**—( वेडावून ) 'झ्यालं तरी काय' ? ( रागानें ) हें पहा, आल्यानंतर त्याला स्वच्छ सांग, कीं असल्या वाह्यातपणानं वागायचं असेल, तर आपला कुठं बाहेर मार्ग पतकर. या घरांत असले हे थेर चालायचें नाहींत मला.

**यमुना**—अहो पण तो आपला एकुलताएक मुलगा. चुकला असेल. पण आपणच नको कां त्याला दिशा लावून द्यायला ? सारखा ससेमिरा तरी किती लावायचा त्याच्या पाठिमागं ?

**सुंदर**—'दिशा लावून द्यायला'— खरं आहे. अग खुळे, तुला तो अजून चिमखडा वाटत असेल; पण त्याचे चाळे नाहीं कां कळले तुला अजून ? आहेस कां थोडी शुद्धीवर ? त्याला दिशा लावून देण्याचे आमचे दिवस सरलेत. आतां आम्हाला दाही दिशा दाखवायला तो मात्र पुरा बनला आहे !

**यमुनाः**—काय केलन् त्यानं ?

( **माधवराव** प्रवेश करतो. )

**माधवरावः**--काय झालं आबासाहेब ?

**सुंदरः**—सतिशाबद्दल बोलत होतों.

**माधवः**--गेला वाटतं त्या श्रीरंगाबरोबर ?

**सुंदरः**—तो श्रीरंग वेरेकर--मुलगा वाईट नाहीं—पण कितीहि सुशिक्षित असला, तरी बोलूनचालून अठरा धान्यांच्या कडबोळ्याचाच ना ? त्याच्या संगतींत राहणं शोभतं कां ह्याला ? ह्यामुळं आप्तेष्टांना तोंड दाखविण्याचीहि शरम झाली आहे मला ! कुणा अब्रूदारांच्या संगतींत रहायचं टाकून, हा पहावा तर आपला सदान्कदा रांडांच्या गोतावळ्यांत ! किती शरमेची गोष्ट ही माधवराव ? असलीं कारटीं जन्माला न आलेलीं पुरवलीं !

**माधवः**—आबासाहेब. या विषयांत बोलण्याचं वास्तविक मला कांहींच कारण नाहीं. पण गोष्ट निघाली म्हणून म्हणतो, कीं त्या श्रीरंगाच्या धाकट्या वहिणीबरोबर अष्टौप्रहर याच्या रासक्रीडेचे खेळ सुरू आहेत.

**सुंदरः**—हो कां ? इतक्या थराला कां या गोष्टी आल्या आहेत ? शिव, शिव ! आजकाल बापानं मुलांनां जन्म देणं म्हणजे जन्माचे दावेदार—नव्हे दुस्मान्—निर्माण करण्यासारखं झालं आहे !

**माधवः**—अक्षरशः खरं म्हणालांत आबासाहेब. आमच्या चिरंजीवाचीं ऐकलींत ना हकीकत मागं ? जरा कुठं ब्र म्हणालों. लागलीच त्यानं Ancestral Property चा कायदा दाखवला अन् हिस्सा वेगळा करून झाला माझ्यापासनं कायमचा मोकळा.

**यमुनाः**—पण मी म्हणत्यें श्रीरंगाचा अन् त्याचा आज इतक्या वर्षांचा स्नेह म्हणून असतो आपला त्याच्या संगतींत. त्यांत बिघडलं काय असं विशेष ? लोकांना काय, वाटेल त्याला वाटेल तीं नांवं ठेवतात; पण प्रत्यक्ष कुणी पहातात कां खरे प्रकार काय असतात ते ?

**सुंदर**:—शाबास ! छान बोललीस ! मघांपासनं मी विचारच करीत होतों, कीं तुझ्या या रसाळ वाणीचा ओघ कुठं घुटमळत होता ! अग श्रीरंगाचा अन् दुसऱ्या त्या रंगीचा स्नेहच भोवणार आहे आपल्याला समजलीस ? पतित भगिनींच्या उद्धार–कार्याची ही नांदी सुरू केली आहे आपल्या चिरंजिवानीं ! ( रागावून ) तें कांहीं नाहीं; तो येतांक्षणींच त्याला म्हणावं आमच्या इच्छेप्रमाणं तुला वागायचं नसेल, तर चारी वाटा अगदीं मोकळ्या आहेत.

**यमुना**—पण हा काय त्रागा ?

**सुंदर**—आणखिन् तुलाहि बजावू ठेवतों, कीं त्याची तरफदारी तुला करायची असेल तर मंगळागौरीप्रमाणं तुझंहि एखाद्या तळ्याविहिरींत मी विसर्जन करीन समजलीस ? यापुढं मला कुणाचेहि असले बाडगे चाळे खपायचे नाहींत. चला, उठा हो माधवराव. ( दोघे जातात. )

**य०**—शर्थ झाली बाई या पुरुषांच्या अरेरावीची ! मला तळं विहीर दाखवणार अं ? काय पण मजा आहे ! माझ्या आईबापांनी कन्या-दानाचं उदक इकडच्या हातावर सोडलं, तें मी एखादी बिनवारशी मिळकत कां होतें ? मुलाचे नि वडलांचे विचार वेगळ असले म्हणून त्या मुलाच्या मागं हात धुवून लागणं बरं कां ? सतीशाची मला किती हौस ! त्याचीं जिवावरलीं दुखणीं गेलीं, पण याची जाणीव एका आई-शिवाय दुसऱ्या कुणालाहि व्हायची नाहीं. मुलगा म्हणजे जसा कांहीं बापाचा खेटर ! पण खेटरांतला खिळा देखील कधीं कधीं बोचतो; म्हणून तो खेटरच कां कुणी अजिबात टाकून देतात ? सतीशाचा कांहींहि दोष नसतां त्याच्यावर भलते आरोप ! पण स्वतःचं वर्तन तरी धड ? कमाल झाली बाई या घराची ! कुणाच्या वर्तनाला कुणी दोष द्यावा, हेंच कळत नाहीं मला. स्थळ पहातांना आईबापांनां तरी कांहीं पाह्यचं होतं ? मेल्या त्या भटानं दक्षणेच्या लोभानं जमवली माझी पत्रिका, अन् केलं एकदाचं सावधान ! जन्माच्या गांठी ग, बाई जन्माच्या गांठी ! (तडक आंत जाते)

## प्रवेश ४ था

—*—

( **स्थळः –सुंदरराव** व **माधवराव** बोलत येतात. )

**सुंदरः**-कुठं म्हणालांत? त्या वेनू नागेशकरणीकडं ? छेः ! तिच्याकडं जाऊन काय नाचगाणं ऐकायचं आहे नुसतं ? अं हं. तिच्याकडं नको माधवराव.

**माधवः**—हें पहा, कोणतंच ठिकाण तुम्हाला पसंत नाहीं, तर मग चौपाटीवर किंवा हॅंगिंग गार्डनवर येतां कां घटकाभर? थोडी हवापालट होईल.

**सुंदरः**—माधवराव, तुम्हाला अजून कळत नाहीं तें हेंच. मी त्या दिवशीं देखील तुम्हाला सांगितलं, कीं आपल्याला घटका दोन घटका मोकळेपणानं बसतां येईल अशा एखाद्या पात्राकडं चला. केली जिवाची थोडा वेळ मजा, कीं पुन्हां आपलं मोकळच्या मोकळं. घट्ट नात्याचे संबंध नकोत मला. मी म्हणतों तसं एखादं अल्पसंतुष्ट पात्र आहे कां तुमच्या माहितींतल ?

**माधवः**— अल्पसंतुष्ट पात्र?–नाहीं बुवा येत ध्यानांत.---बरं, त्या नीराकडं तरी याल कां ?

**सुंदरः**—ही नीरा कोण बुवा ?

**माधवः**-–अहो, ती बोरभाट गल्लींतली ! मागं थोडं गाणंहि शिकत होती; पण आतां तें सर्व कांहीं सोडलं आहे तिनं. दुसरी गोष्ट अशी, कीं चोविस तास तिच्यावर हक्क गाजविणारा असा तिचा यजमान नाहीं. एका गड्याशिवाय दुसरं कुणि नाहीं तिच्या घरांत. तुमच्या आमच्या सारख्यांच्या आश्रयावरच तिचा सारा व्यवहार. तिच्याकडं तरी येण्याचं आहे कां आपल्या मनांतून ?

**सुंद०**—वाः ! छान शोधलंत बुवा हें ठिकाण माधवराव !

पद ५

**बावऱ्या वासना । आवरीं कां वृथा या ? ॥ धृ ॥**
**जाहल्या कामना । दाहति या मना । स्वैर कामांधता । सौख्य आराधिता । भावनासीं कां मुका ? ॥ १ ॥**

असलंच मोकळं ठिकाण हवं होतं मला. पण कां हो माधवराव, तिचा आकडा झेपेल ना माझ्याच्यानं ?

**माधवः**—आबासाहेब, त्याची नका करूं काळजी. मी करीन ती सारी खटपट. चलाच आतां. वेळ नका घालवूं उगाच. [ जातात. ]

( **रमाकांत** येतो)

**रमाकांत**—वाः ! धन्य आहे तुम्हा श्रीयुतांची ! स्वतःचा मुलगा त्या श्रीरंगाकडं नुसता जातो; पण त्यामुळं ह्या सुंदररावानं केवढा गहजब केला ! अन् त्यांना पुष्टि देणारे ते माधवराव ब्रोकर. श्रीरंगाकडं आपला मुलगा सहज बसलेला ह्याला खपत नाहीं; पण हा मात्र स्वतः वेश्येचे उंबरठे बेधडक झिजवूं लागला आहे ! कां ? कशी आहे आमच्या ह्या श्रीयुतांची न्यायनीति ! वास्तविक सतीशासारख्या बुद्धिमान मुलाला या माणसानं थोडी मोकळीक देऊन त्याच्या प्रगतीचे मार्ग खुले करून द्यायचे; त्याला प्रोत्साहन द्यायचं; पण तें सारं बाजूला राहून हा स्वतः मात्र उरफाटंच वर्तन करूं लागला आहे ! कोरडा वेदांत शिकवणारीं असलीं हीं बांडगुळं जोंवर आमच्या समाजांत उजळ माथ्यानं मिरवताहेत, तोंपर्यंत आमच्यासारख्या तरुण मंडळींचा उद्धार होणं शक्य नाहीं. लौकीक एखाद्या ऑफिस सुपरिन्टेंडन्टचा, इभ्रत रावसाहेबाची, पण पडद्याआडची करणी मात्र कळीकुट्ट ! असलीं हीं माणसं बाहेरून दिसायला मोठी डौलदार ! पण आंतून मह्रा डामरट ! अहो, ह्यांच्या घरांत तरुण अशा मोलकरणी-

सुद्धां टिकायची पंचाईत ! तर मग इतर गोष्टी कशाला? दुसरे ते माधवराव: सतीशासंबंधीं भलभलते रिपोर्टस त्याच्या बापाच्या कानीं घालून बापलेकांत वितुष्ट माजवूं लागले आहेत. अच्छा. पहातों तुला लेका. ( जातो. )

## प्रवेश ५ वा

—:०:—

[ स्थळः—नीराचें घर. ती रुमाल विणीत बसली आहे. कांतीलाल-शेठ प्रवेश करतो. ]

**नीरा**—या हो; बसा. ( पंखा देते; पट्टी करूं लागते. )

**कांतीलाल**—कसा काय, बरा हाय ने ?

**नीरा**—आज कुठं इकडं रस्ता चुकलांत ?

**कांतीलाल**—लय दिस झाला; येवूनशी जायाचा इचार होता. आज जरा टेम भिळ्ला म्हनूनसी आला.

**नीरा**—( पट्टी देऊन, रामराम करते व जवळच एका खुर्चीवर बसते. ) तुमच्या संगती ते दुसरे कोण असतात हो ?

**कांती०**—( विचार करून ) हां, हां, ते तो मगनलाल. मारा काकाना छोकरो.

**नीरा**—काय करतात ते ?

**कांती०**—ते तो शेरबाजारमदी शेरचा बिझनेस करते; झाला काय तेचा ?

**नीरा०**—तसं नाहीं हो कांहीं. दहापंधरा दिवसांच्या अगोदर पांच-सहा वेळ ते इकडे आले होते. 'उद्यां येतो' असं सांगून गेले तों त्यांचा पत्ताच नाहीं.

**कांती०**—काय पगाराबिगार देऊनसी गेला काय तुला ते ?

**नीरा**—छे, छे, तसं कांहीं नाहीं. नुसते येऊन बसत कधीं.

**कांती०**—ये बग नीरा, तेला माजी कायबी गोष्ट सांगू नको. अने

दुसरीबी एक वार्ता मी तुला सांगूनसी ठेवते, के तेला तूं दारमदी उबाबी करूं नको.

नीरा—काय झालं आहे असं त्यांचं ?

कांती०—ते सालानें पेडीवरची नवसो रुपयाची केश खाऊनसी टाकली हाय; अने दसबार मानसचा सट्टयाचा बेटिंग बी खाऊन भागून गेला ! तेचा पत्ता नाय अजून. जरा ध्यानमदी ठेव; नाय तो तुजी इजत नक्कामा खराब होयल.

नीरा—दारांत येणाऱ्या नवीन माणसांवर आम्ही विश्वास ठेवणं आम्हाला भाग पडतं. आम्हाला काय माहीत त्यांच्या भानगडी ? कांतीलालशेट, पण अलीकडे असले प्रकार बरेच होतात नाहीं ?

कांती—एक दोन माणस असा जाला म्हणून समदे लोक लबाड हाय के ? साली मलाबी तूं लबाडच समजते तो ?

नीरा—नाहीं हो शेठ, तसं नाहीं म्हणत मी; तुमच्यासारखीं चांगलीं माणसं फारच थोडीं. वत्सलेच्या संबंधांत तुम्हाला मी आज सात आठ वर्षं वळखत नाहीं कां ?

कांती—ये बग नीरा, तुज्या वत्सलेचा नांवबी काड नको आतां.

नीरा—कां बरं ?

कांती०—मी तेला आतां बिलकूल सोडूनसी दिला हाय. सालीच्या जिवासाठीं काय गोष्ट केली मी; अने वरी आतां तेला लय मिजास आली हाय. जात तो नायकणची, पुन् त्येच्या ते बेनलाबी लय नखरा चडला हाय. तूं कवा गेली होती के तेच्या घेरला ?

नीरा—हो, दोनदिवसांपूर्वी गेली होती.

कांती०—मंग काय गोष्ट केली ?

नीरा—तुमची नाहीं कांहीं.

कांती०—मरून जावेद तेला. पन् ए बग, तुला मी एक गोष्ट इचारते; राग नको धर.

**नीरा**—वा: राग कशाचा ? काय पाहिजे तुम्हाला ?

**कांती॰**—तूं सुटीचा पगार घेल के ? (दारावर थाप; तो घाबरतो.) ये तो साली ते मगनलालची सट्टयाची गफलत तो नाय आली ?

**नीरा**—अहो पण असे घाबरता कां ?

**कांती॰**—अरे ये तो इजतचा काम हाय ! मने पेहला अंदर जावादे. (तो आंतल्या खोलींत जातो. पुन्हां दारावर थाप. नीरा दार उघडते. )

( **माधवराव** व **सुंदरराव** प्रवेश करतात. नीरा तबक देते. )

**नीरा**— बसा हं माधवराव; आंत जरा मंडळी बसली आहेत त्यांच्या-बरोबर थोडा वेळ बोलून येते. राग नका हं मानूं. ( ती आंत जाते. )

**सुंद॰**—माधवराव, हा हो काय प्रकार ?

**माधव॰**—थांबाल कीं जरा आबासाहेब. या ठिकाणीं सर्व कांहीं तुमच्या मनाप्रमाणं घडून येईल !

( एक गडी थंडा गुलाबचीं दोन ग्लासं आणून देतो. )

**सुंद॰**—कमाल आहे बुवा माधवराव, तुमच्या ह्या पात्राच्या इथल्या एकंदर आदरसत्काराची ! या थंड्या गुलाबाप्रमाणं माझा दिल्हि आजचं हें गुलगुलीत पात्र पाहून थंड होणार आहे ! पण—कांहो माधव-राव, आपल्या आजच्या येण्याच्या मुहूर्तावरच इथं येणारी ही मंडळी तरी कोण हो ? तुह्मी तर ह्मणालात, कीं ती एकटीच आहे ह्मणून.

**माधव॰**—मघांच मी तुम्हाला ह्मटलं होतं, कीं तुमच्या आमच्या सारख्यांच्या आश्रयावर तिचा सारा संसार अवलंबून आहे. आपण थोडेच तिचे कायमेच पोशिंदे आहोंत ? आलं असेल कुणी; बसेल त्याच्या बरोबर थोडा वेळ; अन् होईल मोकळी आपल्या सेवेला. असा त्रागा करून कसं चालेल आबासाहेब ?

**सुंदरराव**—तसं नव्हे हो माधवराव; पण जिच्याकडे आपण आलों आहोंत तिचं पांच मिनिटंहि आपल्याबरोबर बोलणं नाहीं ह्मणून ह्मणतों. पण कांहो माधवराव, आंतल्या त्या रिझर्व्हड् बॉक्समधें बसलेली ही मंडळी तरी कोण ? आपल्या ओळखीपैकीं नाहीं ना असणार कुणी ?

**माधवराव**—छेः, तसलं कुणीच यायचं नाहीं इकडे.

**सुंदरराव**—मग कोण बरं असावं ?

**माधवराव**—( पाहून ) त्या गुजराथी पत्रावरून मला वाटतं बहुशः एखाद्या शेटजीची स्वारी असावी.

[ माधवराव वर्तमानपत्र उचलून घेतो. त्यावरील आंकडे पाहून ] आबासाहेब, खरा ही गुजराथी बनियाचीच स्वारी असावी. हें पाहिलंत त्यांचं आंकडेशास्त्र ?

**सुंदः**—( निरखून पाहून ) अरे रे ! कुठं आणलंत माधवराव तुम्हीं मला असल्या ह्या धर्मशाळेच्या खलबत्यांत खलायला ?

**माधव०:**—आबासाहेब, इष्काच्या नादानं धुंदावलेली मंडळी आजवर मी चांगलीच अभ्यासीत आलों; आणि त्यांत बारकाईनं पाहिलं, कीं अशा ह्या मंडळीला बाहेरचा नाद तर जोराचा; पण तिकडे देखील त्यानां निर्भेळ स्वराज्य हवं आहे. तें मिळायचं कस ? खर्ची थोडी अन् मिजास बडी. आबासाहेब, ताबेदार असायला नवऱ्याच्या बायका कां आहेत त्या ? अहो आपल्या बायका देखील मर्जी नसेल तेव्हां आपली पुरुषांची मात्रा चालू देत नाहींत. बोलून चालून ह्या वेश्या; त्यांना कसला आला आहे विधि-निषेध ? रंग नको, रूप नको, वय नको, सब घोडे बारा टक्के. बाजारच्या मेवा बापलेकांनीं खावा, अशांतला सारा प्रकार. आबासाहेब, आपणाला ह्या विषयाची अगदींच ओळख नाहीं असं नाहीं; पण आपण आतां हें खुळेप-णाचं सोंग मात्र पांघरलेलं दिसतंय.

**सुंद०:**—मला अगदींच कळत नाहीं असं नाहीं; पण मघापासनं—तें गुजराथी पत्र पाहिल्यापासनं—माझ्या मनांत मोठं विलक्षण काहूर माजून राहिलं आहे.

**माधव०**—अहो पण आपल्याला त्या पत्राशीं किंवा त्या पात्राशीं असं विशेष करायचं तरी काय आहे ?

**सुंदर०**—पात्राशीं करायचं काय ? अहो साफ चुकलांत ! पात्राशीं करायचं आहे, म्हणून तर आलों ना इथं ?

**माधव०**—हो, थोडा चुकलों खरा—–

**सुंदर०**—थोडा नाहीं, अगदीं सबंध चुकलांत माधवराव. तुम्हाला खोल विचार नाहीं म्हणतों तो हाच. ह्या शेटजींना पाहिलं, कीं माझा संताप होतो नुसता—–

**माधव०**—हो, पण आबासाहेब हें कांय भलतंच ! तुम्ही बोलतां आहांत तरी काय ? आपण सध्यां आहोंत कुठं ? बसलोंत कुठं ? आलोंत कशाला, याचा कांहीं विचार कराल कीं थोडा ? परप्रांतीयांच्या नसत्या भानगडी उकरून काढून, त्यांजवर शेरे मारणं व त्यांच्यासंबंधी भलभलतीं विधानं करीत बसण्याचं या ठिकाणीं कांहीं तरी कारण आहे कां ?

**सुंदर०**—तें सारं कांहीं कळतं आहे मला; पण माझं म्हणणं इतकंच, कीं कोणताहि धंदा घ्या, त्यांत हा समाज आपल्या पैशाच्या जोरावर अगदीं आघाडीला. व्यापार घ्या, गिरण्या घ्या, सिनेमा घ्या, सारा बाजारच्या बाजार या समाजानं काबीज तर केलाच केला, अन् बाजारबसव्याहि आपल्या कबजांत नि काबूंत ठेवल्या ! गोवें प्रांतांतील जरी त्या झाल्या, तरी आमच्या त्या महाराष्ट्र भगिनीच नव्हत कां ? असं असून त्यांचे विलास, त्यांचे शोक, त्यांच्या चैनी, त्यांचा उदरनिर्वाह आम्हा महाराष्ट्रीयांना चालवितां येऊं नये, ही किती शरमेची गोष्ट आहे आपणाला !

**माधव**ः—आबासाहेब, तुमचं हें म्हणणं खोटं नाहीं; पण हें पहा, कीं आपल्या उणेपणाचं खापर दुसऱ्यांच्या माथीं फोडायचं, स्वकर्तव्याला पारखं होऊन स्वस्थ बसायचं, हा आपला महाराष्ट्रीयांतला प्रमुख गुण. इतरांना दोष देण्यांत काय बरं अर्थ ? पैसा करतो आहे ह्या साऱ्या गोष्टी. दुसऱ्यांच्या तेजीबद्दल आपल्या पोटांत हेव्यादाव्याचे वायगोळे कां बरं उठावेत उगाच ? आतांचा काळच असा आला आहे, कीं आपणाला या भांडवलवाल्या वर्गाचंच दास्यत्व पतकरावं लागणार आहे ! रानडे, टिळक-गोखल्यांच्या महाराष्ट्राला ह्या शेटजींच्याच तोंडाकडे आशाळभूताप्रमाणं पहावं लागणार आहे ! तें असो, पण मी म्हणतों, कीं परदेशी बानियांची पायचाटी करण्यापेक्षां स्वदेशी बनियांबद्दल नुसती आपुलकी दाखवायला लाज कांहो वाटावी आपणाला ?

सुंद०:—कांहीं तरी Rubbish बोलतां आहांत झालं !

( कांतीलाल आपलं पत्र घेऊन दोघांकडे पहात निघून जातो. नीरा बाहेर येते. )

नीराः—इतके दिवस कुठं होतां माधवराव ?

माधवः—मध्यंतरीं जरा कांहीं कामांत होतों. आमच्या आबासाहेबांची इच्छा झाली म्हणून झुकलों आज तुझ्याकडं.

नीराः—यांना कुठं तरी पाहिल्यासारखं वाटतं मला.( सुंदरराव तिच्याकडे पहातो व दचकतो)

माधव०—तसल्या तऱ्हेच्या फिरणाऱ्यांपैकी नाहींत हे. पाहण्यांत तुझी चूक झाली असावी कदाचित्.

नीरा—तुमच्या ह्या दोस्तदारांना आमच्याकडं जरा संकोच वाटतो.

माधव०—नाहीं, तसं कांहीं नाहीं नीरा. आजच तोंडओळख झाली आहे, परिचय वाढत गेला, ह्मणजे तुला ह्यांच्या स्वभावाची किंमत करवणार नाहीं. पण हें पहा नीरा, तूं मागं शिकत होतीस त्यांपैकीं तुझं तें आवडीचं गाणं ह्मणून दाखव ना ह्यांना.

नीरा—ह्मणेन पुन्हां केव्हां तरी.

माधव०—हं पहा, असले आढेवेढे घेणं बरं नाहीं. आमच्या ह्या आबासाहेबांची थोडीशी करमणूक होईल. ते देखील गाण्याचे एक भोक्ते आहेत. तुला जसं येईल तसं ह्मण.

[ थोडी लाजून मुरडून ती एक गाणें ह्मणूं लागते. दोघे वाहवा करतात. ]

सुंदर—वा ! छान आहे हो हिची आवाजी ! मध्येंच असं शिक्षण कां सोडलं हिनं ?

माधव०—Owing to her circumstances.

सुंदर०—Oh ! I pity the lovely girl !

( आंतल्या बाजूस एक फकीर दोहरा म्हणतो. )

दोहरा.

दिल् किसीकू देना नहिं । दिल्से देना दिल् ॥
नहिं मिला तो नहि मिला । कम् दिल्से मत् मिल् ॥

( इतक्यांत **चंद्रकांत** प्रवेश करून नीराच्या खोलींत तडक जातो. )

**माधव०**—हे कोण नीरा ?

**नीरा**—चंद्रकांत म्हणून आमचे एक जुने ओळखीचे आहेत. पूर्वी आमच्या शेजारीं रहात असत; आतां त्यांची सर्व मंडळी खारला त्याच्या नव्या बंगल्यांत गेलीं आहेत.

**माधव**—अगदीं घरोब्याच्या नात्याप्रमाणं ते तडक आंत गेलं म्हणून आपलं सहज विचारलं.

**नीरा**—तसं कांहीं नाहीं. त्यांचा स्वभाव थोडा भिडस्त आहे. खबरेला म्हणून केव्हांतरी तुमच्यासारखे असे मधें येत असतात.

**चंद्र**—( आंतून 'नीरा' अशी हाक मारतो. तिच्याशीं कांहीं बोलतो, व परत निघून जातो. )

**नीरा**—( बाहेर येऊन ) माधवराव, मी आतां बाहेर जाण्याच्या तयारीला लागते. ( सुंदररावास ) इकडे आमच्याकडे येण्याला आतां संकोच नको वाटून घ्यायला. घर तुमचंच समजून येत जा.

**माधव०**—काय ग नीरा आतां सव्वाआठ साडेआठ झाले, ह्या वेळीं कुठं निघालीस बाहेर ? माझी नाहीं, पण निदान या गृहस्थांची तरी कांहीं पर्वा ?

**नीरा**—तसा राग नका धरूं माधवराव. ते आले होते त्यांच्याबरोबर नाटकाला जायचं आहे मला. तिकिटा देखील काढल्या त्यांनीं. उगाच त्यांना वाईट वाटेल म्हणून नाइलाजानं मी हो म्हटलं. ( घाईनें पट्या करूं लागते.)

**माधव०**—साऱ्या वर्तमानपत्रांतलं आजच्या दिवसाचं भविष्य पाहिलं; पण आम्हाला मात्र चांगला मुहूर्तच सांपडला नाहीं !

**सुंदर०**—मी मघांच म्हणलों तुम्हाला, कीं त्या शामळदासभाईंनीं ह्यांचा बाजारभाव बेसुमार चढवून ठेविला आहे; तेव्हां कशाला करतील ह्या तुमची आमची पर्वा ? "एका गड्याशिवाय दुसरं कुणी नाहीं तिच्या घरांत." असं जें मघां तुम्ही म्हटलंत, तर मग आखफरकवाला शेटजी मघां गेला, तो हो कोण ? बरं, तो एक असो. पुन्हां थोड्याच वेळानं एका गुलहौशी तरुणाची एन्ट्री ! जसा कांहीं घरचा मालकच ! येतो काय, बेत करतो काय, अन् मोठ्या दिमाखानं परत जातो काय ? हें ठिकाण तरी कसल्या प्रकारचं आहे माधवराव ? कां, बोलत नाहीं आतां ? कां या सिरियलमधील आणखिन् कांहीं पात्रांचे प्रवेश व्हायचे आहेत अजून ? येवोत बिचारे ! घर कुणाचं ? अणि येणारांचा तरी काय दोष ? Oh ! damn it ! बस्स, पुरं झालं; जाऊं द्या मला आपला घरीं.

**माधव०**—अहो पण व्हायचं एखाद्वेळीं असं हें; त्यांत कशाला हवा संताप नि त्रागा ?

**नीरा**:—असं रागवायचं काय बरं आपल्यासारख्यांनीं ? ( पट्टया देऊं लागते. )

**सुंदर०**—( पट्टी फेंकून ) आई, जगदंबे, पुरं झालं तुझं हें आदरातिथ्य ! [ पानाच्या तबकांतील पानें घेऊन व फाडून तीं इतस्ततः उडवितो; इतक्यांत एक **पारशी गृहस्थ** येतो.] ठरल्याप्रमाणं हें तिसरं पात्र आलं बरं कां माधवराव ! आवजो बावाजी, बेसो तमे आरामथी !

[ पडदा. ]

**अंक पहिला समाप्त.**

# अंक दुसरा

## प्रवेश १ ला

[ **स्थळः**—वत्सलेचें घरः **सतीश** 'बंन्धनाच्या पलीकडे' हें पुस्तक वाचीत बसला आहे. **सुशिला** बुलबुलतरंग छेडीत बसली आहे. ]

**सतीश**—कां असं मधेंच कां थांबवलंस ? किती मोड गत ती ! वाजीव, आणखिन् थोडं वाजीव.

**सुशिला**—मला आतां कंटाळा आला आहे वाजिवण्याचा. त्या पुस्तकांतल्या एका मुद्याबद्दल पुढं सांगण्याचं कबूल केलं होतंत ना तुम्हीं ? मग सांगानां आतां.

**सतीश**—तुला असं विषेश काय आवडलं ह्या पुस्तकांत ? अग, सामाजिक **'बंन्धनाच्या पलिकडे'** पोचविणाऱ्या असल्या ह्या पुस्तकावर अधिक चर्चा करण्यांत, सुशा, तुला कोणतं समाधान वाटतं ?

**सुशिला**—समाधान नव्हे; पण असलीं पुस्तकं वाचून सामाजिक बंधनं शिथिल होतात, किंवा समाज स्वैरवर्तनी बनून सब्गोलंकार माजतो अशी कां तुमची कल्पना आहे ?

**सतीश**—छेः, छेः; अगदींच चुकलीस तूं ! समाजांतील घाण उपसणाऱ्या आजच्या लेखकांच्या लिखाणाला अश्लीलतेचं शेलापागोटं अहेर करणारे संतमहंत कुणी असतील ते असोत; पण मला त्यांची विचारसरणी मुळींच पसंत नाहीं.

**सुशिला**—पण कां हो सतीश, अलिकडं पहावं तर ज्याच्या त्याच्या तोंडी अश्लील वाङ्मयाच्या निषेधाची भाषा !

**सतीश**--उघडच आहे. असले हें महाभागच उलट्या बोंबा मारीत असतात! अग इथलेच एक गृहस्थ; श्रुतिस्मृतिपुराणांतलं पुरण पचवून ढेकर देणारे; पण मुळांत काय ?

**सुशिला**—कोण हो ? ते अण्णाशास्त्री धूमकेतु कां ?

**सतीश**—हो, तेच ते. लोकसंग्रहाचं गाठोडं बगलेंत मारून एक एक दोन दोन आठवडे ही स्वारी दौऱ्यावर निघाली, कीं त्यांच्या त्या सौभाग्यवतीच्या कुंकवांत दुसरे शेअरहोल्डर्स ! असल्या पुण्यस्मरण (?) श्रीयुतांचा विचार करायचा झाला तर '**वृद्धा नारी पतिव्रता**'च्या जीवन–चित्रपटांसारखे नमुने पुढं ठेवूनच आपणाला त्यांचा विचार करावा लागेल !

**सुशिला**--पण मी म्हणतें, कीं अश्लीलतेविरुद्ध चाललेल्या सुश्लील चळवळींनीं मराठी वाङ्मय नि मऱ्हाठा समाज यांची अधिक कां उन्नति होईल.

**सतीश**—अग, कावळयांच्या कलकलाटाला विचारतो कोण ?

**सुशिला**--मला वाटतं, हिन्दु संस्कृतीला पाश्चात्य विचारांची झळ लागूं नये, म्हणून असावेत या मंडळींचे हे प्रयत्न.

**सतीश**--समाजाला वा राष्ट्राला पारतंत्र्यांत खितपत ठेवणारी कोणतीहि संस्कृति वांझच ठरेल ! अन् तिचा लटका अभिमान धरणारे लोक नपूंसकच ठरतील ! तूं म्हणतेस त्या आपल्या आर्यसंस्कृतींत पूर्वी अनेक 'रसेल' होऊन गेले ! प्रत्यक्ष आपल्या धर्मग्रंथांत अश्लीलता, अनीति, वगैरेंचीं कैक रंगीबेरंगी चित्रें आढळतील आपणाला; पण, जाऊं दे हा विषय. हं, काय म्हणत होतीस तूं मघां ? ह्या पुस्तकांतला कोणता तुझा तो मुद्दा ? हो, आठवलं. व्यक्तिप्रामाण्याची धोंड लाथेनं झुगारून बंधनांची कोंडी फोडणं; होय ना ?

**सुशिला**--हो, तोच तो मुद्दा.

**सतीश**--ऐक, ह्या कादंबरींतला नायक 'प्रभाकर' यानं 'मैना' नांवाच्या एका वेश्येच्या मुलीबरोबर लग्न करण्याचं ठरवलं; पण हें त्याच्या

बापाला सहन न झाल्यामुळं त्यानं त्याला हाकून दिला. पुढं 'प्रभाकरा'नं आपल्या 'शांति' नांवाच्या बहिणीच्या मुक्ततेसाठीं बापाला कोर्ट दाखवलं.

**सुशिला**—अहो पण जन्मदात्या पित्याची अशा तऱ्हेनं विटंबना करणं सुपुत्राला शोभत नाहीं.

**सतीश**—सुशा, आडवं आलेलं कापण्यांत भ्रूणहत्त्या ठरत नसते.

**सुशिला**—समजा, तुमचीं मतं आबासाहेबांना पसंत नसलीं, अन् त्यांनीं जर तुमच्या मार्गांत अडथळा आणला, तर तुम्हीहि असंच कराल वाटतं ?

**सतीश**—सुशा, तुझ्या ह्या प्रश्नाचा रोख माझ्या ध्यानीं आला नाहीं असं नाहीं; तुला उत्तर देण्यापक्षां, त्यावेळीं काय करायचं हें मी त्या ऐन-वेळींच ठरवीन. तूर्त सोडून देऊं हा विषय.

( **वत्सला** येते. )

**वत्सला**—तुला कांहीं धोरणबिरण आहे कां ?

**सुशिला**—बायजी, काय झालं ग ?

**वत्सला**—समजूनउमजून वेड पांघरतेस ?

**सतीश**—( वत्सलेस ) बरं, येतों मी.

**वत्सला**—सतीश, राग नका हं मानू. कधीं येतां पुन्हां ?

**सतीश**—श्रीरंग येईल म्हणून वाट पाहिली इतका वेळ. एक दोन दिवसांत येईन पुन्हां. बरं येतों मी. ( जातो. )

**वत्सला**—या हो. सुशिले, मी तुला साफ सांगतें, कीं या पुढं तुझे हे छंद मला मुळींच खपणार नाहींत.

**सुशिला**—बायजी, तूं माझ्यापेक्षां वडील; मला व दादाला तूं मुलां-प्रमाणं सांभाळंस; अन् अलिकडंच आमच्याविषयीं तूं आपलं मन असं कां बरं केलं आहेस ?

**वत्सला**—तुम्हावर प्रेम केलं तितकं पुरें झालं.

**सुशिला**--अग पण असं झालं तरी काय ?

**वत्सला**---कळून सवरून विचारायलहि तुला लाज वाटत नाहीं ? होतं नव्हतं त्याची वाट लावून आजपर्यंत तुम्हाला सांभाळलं; पण यापुढं तें जड झालं आहे मला समजलीस ?

**सुशिला**—मग याला उपाय ?

**वत्सला**—याला उपाय ? एखादा नवरदेव पूज तूं, म्हणजे बरं होईल आपल्या संसाराचं !

**सुशिला**—मी लग्न करूं नये म्हणतेस ?

**वत्सला**—लगीन केल्यावर तुझा तो नवरा कां पोशील मला ? आपण कोण ? आपला धंदा कोणता ? आणि लग्नाच्या फंदांत पडून आपल्याच हातांनीं आपली नासाडी करून घेण्याची विद्या कुणी ग शिकविली तुला ?

**सुशिला**--याला कारण तूंच.

**वत्सला**--मीच ? तर मग त्या श्रीरंगाला घेऊन जा कुठं. यापुढं तुझे हे उरफाटे चाळे मला खपणार नाहींत. जातींतल्या शिकलेल्या तुझ्या त्या मैत्रिणींनीं तुला चांगलीच शिकवलेली दिसते; तरीच तुझ्या तोंडून इतके चुरुचुरु बोल निघतात !

**सुशिला**—बायजी, त्यांचं नांव कशाला घेतेस उगाच ? त्यांनीं काय तुझं असं घेऊन खाल्लं आहे ?

**वत्सला**--माझं घेऊन खाल्लं नसेल; पण माझ्या घरांत अवदसा आणायला त्या रांडांचा उसाटपणा नडला आहे. दोन अक्षरं शिकल्यामुळं त्यांना गृहस्थीपणाची मिजास तरी किती चढली आहे ! पण घरींदारीं त्यांचे दुसरे प्रकार राजरोस चालू असतात, याची आहे कां तुला कल्पना ?

**सुशिला**--आपल्याच एका समाजांतल्या तरुण मुलींचा कां उगाच उद्धार करतेस ? पांढरपेशा समाजांतील, खानदानी घराण्यांतील साऱ्याच

विवाहित-अविवाहित तरुणी धुतल्या तांदळांप्रमाणं अगदीं चोख असतात असं कां तूं म्हणतेस ?

**वत्सला**—असं मुळींच नाहीं. पण त्यांच्या उठाठेवी कशाला मला ? माझं म्हणणं इतकंच,—

**सु०**—कीं सतीशांच्या अन् माझ्या वागणुकींत तुला असले प्रकार दिसतात; असंच ना ?

**वत्सला**—तुझीच गोष्ट कशाला ? गेल्या महिन्यांतली एक गोष्ट. त्या तानी साखळकरणीची मुलगी—तुझी पूर्वीची मैत्रीण--ती लीला; धंद्यांत न पडतां शिकायला लागली; मॅट्रिक झाली; कॉलेजांत गेली; 'लगीन करीन तर एखाद्या बॅरिस्टरशींच करीन', अशी जिकडे तिकडे तिनं बोंब केली, पण काय झालं तिचं तें कळलं कां तुला ?

**सु०**--काय झालं ? गेली कां ती पळून एखाद्या मोटर ड्रायव्हरबरोबर ?

**वत्सला**—अग, मोटार ड्रायव्हरच कशाला ? तिच्या पणांचा नि मनाचा ब्रेक धरणारा एक सुशिक्षित ड्रायव्हर मात्र वेगळाच होता. बॅरिस्टरशीं लगीन करण्याचं राहिलंच; पण शेजारच्याच एका फिटरशीं तिचं गुपचूप लगीन झालं ! उसाटपणामुळं तुला आतां हें कळायचं नाहीं; पण याचा अनुभव पुढं येईल समजलीस ?

**सु०**—पण तुझं म्हणणं तरी काय आहे बायजी ?

**वत्सला**—धंद्यांत पडून माझ्याजवळ राहण्याचं तुझ्या मनांत नसेल तर तुला रस्ते मोकळे आहेत. धंद्यांत पडावं म्हणून गांवीं तुझा 'शेस' विधि केला, तुला देवाला वाहिली—

**सु०**—वाटेल त्याचा नैवेद्य देवाला दाखविला, कीं त्याचा उपभोग वाटेल त्यानं घ्यावा ! तूं मला देवाला वाहिलीस ना ! तर मग माझा तो देवच शोधून काढीत आहे मी.

**वत्सला**—अस्सं ? माझ्या प्रसंगाचे वेळीं तुला ही बुद्धि झाली कां ?

**सु०**—देईन तुला याचा जबाब. ( जाते. )

**वत्सला**—आमच्या ह्या गोमन्तक समाजांतील थोड्या शिकलेल्या मंडळींनीं सुधारकी चळवळी करून लग्नाच्या भानगडी सुरू केल्या आहेत खऱ्या; पण त्यामुळं माझ्यासारखींचे संसार मात्र मोडकळीस येऊं लागले आहेत. ( **श्रीरंगा**ला पाहून त्याच्याकडे पाठ करून बसते. )

**श्रीरंग**—बायजी, अगे बायजी; बायजी, ओ कां नाहीं ग देत ?

**वत्स०**—काय आहे रे ?

**श्रीरंग**—माझी वाट न पहातां सतीश कां बरं गेला निघून ?

**वत्स०**—त्याची चौकशी तूं कर जा.

**श्रीरंग**—बायजी, कारण नसतां इतकं रागवायला काय झालं आज तुला ? कोण कांहीं बोललं कां तुला ?

**वत्सला**—मला वेड लागलंय. माझ्याशीं बोलून उगाच वेळ कां घालवतोस ?

**श्रीरंग**—अशा तऱ्हेचं तुझं स्वरूप पहाण्याचा हा पहिलाच प्रसंग म्हणून विचारतों. कांहीं भानगड झाली आहे कां ? अन् ती मला सांगायला तुला आजच इतका परकेपणा कां वाटला ?

**वत्स०**—यापुढं तुम्हा दोघांची मी कोणीच नाहीं. तुम्ही आतां मोठीं झालांत; तुमचा मार्ग तुम्ही पाहिल्यास त्यांत तुमचं कल्याण होईल. आईची शेवटची इच्छा म्हणून आजपर्यंत तुमच्याकरतां झीज सोसली. यापुढं स्वतः मिळवून आपला संसार निराळा करा.

**श्रीरंग**—म्हणजे असंच किनई, कीं मी तुझा शेवटचा निरोप घेऊन घराबाहेर कुठं तरी पडावं ?

**वत्स०**—जा, रहा, तुला वाटेल तें कर. जास्त बोलून माझं डोकं उठवूं नकोस उगाच. ( आंत निघून जाते. )

**श्रीरंग**—काय मजा आहे पहा ! डोळ्यांसमोर उदात्त ध्येय ठेवायला गेलों, तों परिणाम उलटा झाला !

पद ६

**साचें कलियुग आलें ॥ धृ० ॥ बोल कुणाला कशासी लावा ? करि मम दैवचि चाळे ! ॥१॥ खोल निराशा मनासि दाही, अवनत भाग्याचि चालें ॥ २ ॥**

आमच्या भगिनींचा उद्धार व्हावा, म्हणून आमचा सुशिक्षित तरुण बंधुवर्ग प्रयत्न करूं लागला आहे. पण दुसरी गोष्ट अशी, कीं वत्सलेसारख्या स्त्रियांचं आयुष्य डोळ्यांसमोर उभं राहिलं म्हणजे विचार मात्र थंड पडतात. मी स्वतः शिक्षणाच्या मागं लागलों नसतों, तर आज कोणता धंदा मला करावा लागता ?—हो, वत्सलेच्या धंद्यातले होते इतर मार्ग मोकळे. अडीच साडेतीन मराठी पुस्तकं शिकून तबलजी अथवा सारंग्या बनून, बहिणीच्या किंवा तिच्यासारख्या इतर बायांच्या मागं ' ना–धी–धी–ना ' वाजवित बसण्याचा पेशा पतकरला असता, तर खात्रीनं मला वाटतं, कीं आमच्या समाजाच्या शिजणाऱ्या हंडींत माझीहि बिरयानी छान तयार झाली असती ! तर मग मी मार्ग चुकलों किंवा कसं ?

पद ७

**लटका भरला पसारा । मोहचि सारा, मानी जगाला ॥ धृ० ॥ वाटे जो जो, मार्ग बरवा, तो तो मनीं कां न माना ? ॥१॥**

कोण बरं आलं या वेळीं ? ( **हिरालाल** येतो. ) कोण आपण ?

**हिरा०**—मारू नाम हिरालाल चतुर्भूज.

**श्री०**—काय हवं आपल्याला ?

**हिरा०**—ते वत्सला ह्याय के घेरमंदी ?




हिरालालः—ते वत्सला हाय के घेरमंदी ?  ( पृ. ३२ )

**श्रीरंग**—( तोंड फिरवून ) आलीं; वटपौर्णिमेच्या वटवृक्षावर विश्रांति घेणारीं हीं वटवाघळं आलीं ! ( जातो. )

**हिरा०**—सुं साली आय रांडनी घेरनी मजा छे ! आम आवा वेपारी माणसं पड्या ने येना दरवाजाउपर आव्या छे, तो हमारी दाद कोई लेतो नथी. लेहे, सुं एवनू रुबाबमां निकली गया ! आखरे रांडनाच खानदाननो केनी ! अने वरी तेने मिजास केटली !! आगली नायकणनी ये रीत नई हती. खानदानी माणसोनी अब्रू सचवाती हती. पण हालनी नायकणो तो घणी मगरूर अने बेपर्वा रहे छे !

( हातांत पिशवी घेऊन **कृष्णा** येतो. )

**कृष्णा**—बायजी, ए बायजी, ( वत्सला आंतूनच 'कोण आसात मरे' असें विचारते. ] कोण शेटी येयल्यात. [ 'लेका बसच्याक सांग' असें ती आंतून म्हणते. कृष्णा हिरालालास बसावयास सांगून आंत जातो. थोड्या वेळाने वत्सला येते. ]

**हिरा०**—ते दिवसच्या गोष्टीचा तूं आज देल के जबाब ?

**वत्सला**—कसला ?

**हिरा०**—तूं खर्ची घेल के ?

**वत्स०**—नाहीं. माफ करा.

**हिरा०**—ये बग वत्सला, दोन चार रुप्याची गोष्ट नाय करते मी. एक टेमला पांच पचास देऊनसी बी जायूल.

**वत्स०**—पुन्हां अशी गोष्ट माझ्याजवळ तरी काढूं नका.

**हिरा०**—अरे तेमदी एवडा काय झ्याला ? आतां तो लय नायकण असाच करेला लागली हाय. आमच्या लोकचा बी बेपार बसूनसी गेला; आतां हाय कोनचे पास मयन्याचा सो-पासो-हजार रुप्या नायकणला पगार देयला ? ते पयला वखत नाय हाय आज. दरबाजामंदी चालूनसी आलेला पेसा तुमी लोक असा फेकूनसी देते. ये काय चांगली गोष्ट हाय ?

**वत्स०**—कोणी चांगला मनुष्य असला, तर त्याचा मी बंदीचा पगार घेईन.

**हिरा०**—ए वत्सला, तूं ये काय गोष्टी करते ? जे वखताला माजा बेपारधंदा तेजीमंदी होता, तें टेमला पांसो पांसो रुप्या मयन्याला पगार नायकणला दिला होता. साला नांव बंदी, पुन् पगार देनार ते शेटलाच बंदी, असी गोष्टी झाली !

**वत्सला**—पण सगळयाच नायकिणी अशा लबाड व बेमान असतात ?

**हिरा०**—अरे समदी असी नाय तो कसी हाय ? ते एक आपी करूनसी होती; तेला बसो रुप्या मी पगार दिला; पयली पयली ते लय चांगली चालली. आज दागिना पायजे, काल पातल पायजं, परमदाडे ब्लावस पायजे, एम् पायजे तेम् पायजे, असा करूनसी दर मयन्याला केटला परचुटण रुप्या खरच केला; वरी ते साला 'गजरा अलावन्स' !—

**वत्सला**—म्हणजे ?

**हिरा०**—ते असा हाय, के आमी लोक रात्च्या नव दाचे टेमला बार निंघनार; ते वख्ताला फूलची गजरा लय सस्ता मिलते; दुपारचे टेमला मंगू मळे. ये गोष्टी त्येच्या ध्यानमंदी आली, तवा बोलते, के 'मी दुपारचे टेमला गजरा घेल; मला पैसे देऊनसी ठेवा', असा सांगूनसी रोजना आट आठ आना मारापासथी लेती हती. अवडा समदा करूनसी बी माजे टेमला सिनेमाला नाय तो बाजूना घेरमंदी दुसरेसंगती मजा मारेला जात होती ! असा तुमचे लोकवर आमी इसवास कसा ठेवेल ?

**वत्सला**—तुम्ही आतां आप्पी म्हणून जें नांव घेतलंत त्या बाया कारवारकरणी. आम्ही गोवेंकरणी इतक्या निमकहराम नसतों. ज्याच्याकडून अर्धी भाकरी मिळेल, तोपर्यंत सगळ्या भाकरीच्या आशेनं त्याच्याशीं आम्ही निमकहरामपणा सहसा करणार नाहीं.

**हिरा०**—अरे ये कसाला वार्ता करते ?

**वत्स०**—तुम्हांला माहीत नाहीं. पूर्वीचे लक्षाधीश आमच्या गोवेंकरणी-शिवाय दुसरी नायकीण ठेवीत नसत. वर्षेन् वर्षे ते तिचा सांभाळ करीत. ती पण त्याच्याशीं इमानानं वागत असे.

**हिरा०**—येच्यामंदी मोठा नवल काय सांगते ?

**वत्स०**—तसं नाहीं. पण त्याच शेटीवर अब्रूचा प्रसंग आला, तर आमची गोवेकरीण आपलं सर्वस्व देऊन आल्या अन्नदात्याची अब्रू वाचवी. एखादी गरती कसोटीच्या वेळीं बेमान ठरेल; पण अस्सल कलावन्तीण आपलं इमान सोडणार नाहीं ! तुम्हीं आपले एकटीच्या एका अनुभवावरून सगळ्यानांच दोष लावतां.

**हिरा०**—अरे हमे काय समजते, के अमकी ये गोवेची ने फलाणी ते कारवारची नायकण हाय ?

**वत्स०** —खरं म्हणाल तर आम्हां कलावन्तीणींचीं कुटुंब या मुंबईत फारच थोडी आहेत. कांहीं वर्षांमागं आम्हाला मोठमोठ्या हुद्देदार अधिकाऱ्यांकडून व लक्षाधिशांकडून जो मान मिळत असे तो आतां कमी झाला. आमच्या गोव्यांतील कुणबीणी पण या शहरांत येऊन कमाईच्या जोरावर आमच्यावर सरशी करायला लागल्या. अमकी ही कलावन्तीण कीं कुणबीण, हें कोण पहातो ? अलिकडे कारवार, कुमठा, मंगलोर या ठिकाणच्या बाया मुंबईत खूपच आल्यामुळं आमच्या गोवेंकरणींच्या धंद्याची किंमत राहिली नाहीं. ह्या 'भांगरापट्टा'वाल्या बायांनीं आमच्या कलवंतपणाच्या खऱ्या धंद्याची माती केली. शिवाय, दुसरी गोष्ट अशी, कीं तुमचे लोकहि आतां पूर्वीसारखे इमानी राहिले नाहींत. आम्हाला आमच्या सगळ्या हयातीचा विचार करून वागावं लागतं.

**हिरा०**—हास तो वरी. तेबी बराबर हाय तुजा; पन् मी सांगते तसा नाय कबूल होते तूं ?

**वत्सला**—मी मघाशींच तुम्हाला सांगिलं. तुम्ही म्हणतां तसं मला कबूल करतां येणार नाहीं.

**हिरा०**—बरा, तुजी मर्जी ! पण मी तुला अशी गोष्टी सांगते, के तुज्या बेनला —

**वत्सला**—कां ?

**हिरा०**—तूं असी गरम कसाला होते ? ए बग, माजा एक बेपारी

दोस्तद्दार है; ते तुज्या बेनची दोस्ती करेला मांगते. अने ते मनुष बी एक जंटलमेन हाय.

**वत्सला**—काय म्हणतां ? कोणाची ?

**हिरा०**—तुजा भेजा आज ठिकानवर नाय हाय; मी काल येल तवा नक्की इचार करूनसी सांग. आतां टेम झ्याला; जाते मी. ( जातो. ).

**वत्स०**—जातां जातां काय म्हणाला हा ? सुशिलेची—गोष्ट ?—ही खरी गोष्ट ?—खरीच असेल; कारण तो म्हणाला 'मी उद्यां येईन, नक्की विचार करून सांग.' तो उद्यां येणार ! पण मी नक्की विचार कशाचा करूं ? माझ्या विचाराला आतां काय किंमत राहिली आहे ? विचाराच्याच दोन गोष्टी सांगायला गेली, तर ती म्हणाली, कीं ' देईन तुला जबाब. ' माझ्याच कमाईनं रंगारूपाला येऊन मलाच उलट ती जबाब देणार ! माझ्या सांगण्याप्रमाणं ही जर धंद्यांत पडती, तर माझी चिंता दूर नाहीं का होती ? पण मनांत मांडे नि पदरांत धोंडे ! या पोरीच्या आशेमुळं इतके दिवस मला धीर वाटत होता. पण आतां तो पार सुटला. श्रीरंगाची दोस्ती नसती तर सतीश तरी या घरांत कशाला येता ? घरांतलि माणसांदेखतच एखाद्या तरुण तरुणीची घसण जास्त होत गेली, तर अंतीं तिचा परिणाम काय होईल ? प्रेम—प्रेम ! प्रेमाच्या गांठी—पण त्या कुजल्याशिवाय सुटतील कशा ? सगळीकडे जर तेच प्रकार तर सुशिलेला तरी मी दोष कां द्यावा? माझी स्थिति बरी नाहीं म्हणून मी तिच्या आड कां यावं? तिच्या तरुणपणांतील उमेदीच्या नि इच्छेच्या मी आड आली, तर मला पापच लागेल. तिच्या जागीं मी जर असल्यें, तर सतीशाच्या प्रेमांत मी कशावरून सांपडलें नसतें? पण नको. सतीश !–विचारी सतीश ! ! अहा ! बोलणं नि करणं यांचा एक जीव ज्याच्या अंतःकरणांत झाला आहे, तो सतीश कुणाच्या प्रेमाला पात्र होणार नाहीं ?

पद ८

**सुखद किती सहवास सदा । लाभयोग हा मजला ।।धृ०।। जगांत मोहमयी वैखरी स्रवताहे ।**

**वचनीं फसविती घाव पडे का साहे । परि तव साच कृति । संशय वरि भावातें ॥ १ ॥**

## प्रवेश २ रा

[ **स्थळः**--रस्ता; **सुंदरराव** येतो. ]

**सुंद०**—विहारांत राहून धर्मज्ञानाचा प्रसार करणाऱ्या कुठं त्या बौद्ध-भिक्षुकिणी अन् कुठं आतांच्या ह्या देवदासी ! वारांगना, कलावंतीणी, नायाकिणी, देवळिणी, भाविणी, मुरळ्या, वेश्या, गणिका, पण्यांगना, ओ हो ! या सगळ्या पतित स्त्रियांचा उद्धार ! काय मजा आहे बुवा ! चहूंकडं पहावं तों वेश्यांच्या उद्धाराची फाल्गुनी बोंब ! ! पण या उद्धारकार्याची तिडीक कुणाला ? आमच्या कट्टर सनातन्यांना ? छे. मग मुरदंग्याप्रमाणं उभा असलेल्या मवाळपक्षाला ! नाहीं. तर मग या वेश्योद्धाराचा पोटशूळ कुणाला लागला आहे ? खरं म्हणाल तर स्वैरसमागमाची तरफदारी करणाऱ्या आमच्या अविवाहित तरुणांना ! वाः, छान ! अहो उंदराच्या तोंडांत खोबऱ्याचे तुकडे दुसरं काय ! वेश्यांच्या विलासमंदिराकडं जाण्याची माणसाची नैसर्गिक प्रवृत्ति जोंपर्यंत कायम आहे, तोंपर्यंत तरुणांचेच प्रयत्न कशाला, पण परिषदा अन् कायदेशीर चळवळी या देखील अखेर वांझच ठरायच्या. लैंगिक विषयावरील पाश्चात्य ग्रंथकारांचे ग्रंथ वर वर चाळून आमच्या संस्कृतीला न मानवणारे उष्टे सिद्धांत नवविचारांच्या गोंडस नांवाखालीं बसवून, सुधारणा—सुधारणा—म्हणून ओरडणाऱ्या आमच्या मंडळींना काय म्हणावं तेंच कळत नाहीं मला. अगदीं नासकी नीति, म्हणून वेश्योद्धाराच्या प्रश्नाला सनातनी वृत्तीच्या समाजानं नाकं मुरडलीं, तर मी म्हणतों, कीं त्यांत इतकं बिघडलं कुठं ?

पद ९

**भाव साच समजा । वसत सतत**
**जनीं, पाप जगतीं या ॥ धृ० ॥**
**प्रखर पोक जरी मानित कुणी हा ।**
**विकल सकल भवभास जाहला ।**
**जाई परि विरत । आस मम गमत ॥१॥**

दुसरी गोष्ट अशी, की जिवाला किंचित विरंगुळा, मनाला थोडीशी थारेपालट, म्हणून कधींकाळीं कुणी वेश्येचा जिना चढत असले, म्हणून तिचा एकदम उद्धार करण्याची एखाद्यानं भाषा करणं मला तर पसंत नाहीं. वेश्या म्हटली, कीं ती दगाबाज, गळेकापू, अगदीं शुद्ध जळू ! '**नाट्य-गाननिपुण कलावतिची ही माया**' हे विचार मांडणारे आमचे **देवलमास्तर** खुळे का होते ?

( **माधवराव** प्रवेश करतो. )

**माधव०**—काय, आबासाहेब !

**सुंदर०**— अहो होतां कुठं ?

**माधव०** -आजच येणार होतों आपल्या घरीं.

**सुंदर०**—अहो पण इतके दिवस झुकलां होतां कुठं ? पत्ताच नव्हता तुमचा मुळीं ?

**माधव०**— काय सांगू आबासाहेब, या ओळखीच्या मंडळींनीं भंडावून सोडलं होतं मला.

**सुंदर०**—ऑं ! काय झालं म्हणतां ?

**माधव०**—तसं कांहीं नव्हतं विशेष. मागील शनिवारीं त्या 'विलांडर बँके'च्या स्टाफची सिंगींगपार्टी असल्यामुळं गुंतलों होतों थोडासा.

**सुंदर०**---थोडासा—सबंध नव्हतात ना गुंतला ?

**माधव०**—अहो बँकातली ही मंडळी तरी किती तऱ्हेवाईक ! यांनीं डेबीट क्रेडीटचे आकडे फक्त मोजावेत; बाकीच्या व्यवहारांबद्दल —

**सुंदर०**—शेवटीं बॅलन्स झीरो — असंच ना ?

**माधव०**—अहो, गाई तर हवी; पण ती आखूड शिंगांची, थोडं खाणारी, अधिक दूध देणारी अशी हवी; मिळायची कशी हो ?

**सुंदर०**—म्हणजे त्या गाण्याचा प्रोग्रामाला गाई दिलीत, कीं बाई दिलीत ? समजायचं तरी काय यांत ?

**माधव०**—प्रोग्रामच्या व्यवस्थापकांपैकीं दोघे आले मजकडं, अन् म्हणतात कसं, अहो माधवराव, आमच्या पार्टीला एक सुंदरशी गाणारीण हवी. ती काय मागेल ते पैसे देऊं.

**सुंदर**—मग या मागणीप्रमाणं पुरवठा केलात का ?

**माधव**—शेवटीं कंटाळून मी हें काम तिसऱ्याकडंच सोपवलं. अहो, या टवाळांच्या भानगडींत पडून नसत्या ऊपाधी करतो कोण ?

**सुंदर**—म्हणजे ? तुमच्या ओळखीनं त्यांना एखादी फुकट हवी होती वाटतं ?

**माधव**—नव्हे, तसं नव्हे. त्यांच्या कन्डीशन्स मोठया विचित्र होत्या ! बाई देखणी हवी; तंबोरा सोडून आदा करणारी हवी; ठुमरी, गझल, कवाली व लावणीहि गाणारी हवी; विरारसारख्या लांब ठिकाणीं येणारी; थोडके पैसे म्हणजे तीस पस्तीस रुपयांचा विडा—

**सुंदर०**—अरे बापरे ! तीस रुपयांचा विडा अं ! मग दिडकीला मिळणाऱ्या पानपट्टयांचीं दुकानं ओमाड ?

**माधव०**—शिवाय, स्वभावानं ती बाई सोशल् हवी; आमच्याबरोबर थोडं रिफ्रेशमेंट घेणारी हवी, ही त्यांची दुसरी अट.

**सुंदर०**—वाः छान ! अहो एखाद्यानं आपली भावी पत्नी पसंत करण्याचा अन् निवडण्याचाच हा प्रकार ! प्रोग्रामच्या बोहल्यावर नव्हतं ना तिचं ' लगीन सावधान ' उरकायचं ?

**माधव०**—अहो ज्यांच्याकडं मी घेऊन गेलो त्या बायांची गाण्याची त्यांनीं ट्रायल काय घेतली, नि फुकटच्या पट्ट्या खाऊन चालते काय झाले ! कांहीं एटिकेट्स तरी ह्यांना ? शेवटीं त्यांना सांगावं लागलं, कीं बाबांनों तुमच्या या चवचाल अन् लहरी वृत्तीला साजेशी बाई तसल्याच एखाद्या मोहल्ल्यांत जाऊन शोध आपली. आबासाहेब, पैसे घेत असल्या तरी त्या बायांना कांहीं अब्रू आहे कीं नाहीं ? त्या बायांबरोबर भलताच लघळपणा करणं शोभेल कां केव्हां ? गेल्या वर्षीचाच एक प्रकार. असल्याच एका पार्टीच्या वेळीं बरीच मंडळी ' बूझिंग ' अधिक झाल्यामुळं गाण्याच्या वेळीं बाईची mischief ( थट्टा ) करूं लागली. बाई पण मोठी कडकच होती. घेतलेले अॅड्व्हान्सचे पैसे त्यांच्या आंगावर फेंकून आपल्या साजिंद्याबरोबर सीधा स्टेशनचा रस्ता धरला तिनं !

**सुंदर०**—वाः शाबास तिची ! अलिकडल्या या गुलालगोट्यांच्या नांग्या ठेचणाऱ्या अगदीं अशाच बाया हव्यात ! हो, बरी आठवण झाली—

**माधव०**—हें पहा आबासाहेब, इकडं शेजारींच एका गृहस्थाना भेटून येतों; आपण इथंच उभे रहा; मी पांच मिनिटांतच येतो. (जातो.)

**सुंदर०**—ही स्वारी रात्रीची एखादी अॅपॉइंटमेंट ठरवायला तर गेली नसेल ना ?

( देवळांत जाण्याच्या तयारीनें **नीरा** येते. )

**नीरा**— अगबाई, हे तर आबासाहेब ! आज कुणिकडं इकडं ?

**सुंदर०**—कोण, तूं नीरा ? पण कां हो, अशा लंगता कां ?

**नीरा**—पायाला लागलं आहे थोडं ?

**सुंदर०**—अस्सं ! मला आपलं वाटलं—

**नीरा**—ही हो काय भलतीच थट्टा ?

**सुंदर०**—अग बोलूनचालून तुम्ही वारांगना! तेव्हां म्हटलं लागायचे एखाद्वेळीं गरमनरम वारे तुमच्या आंगाला! पण काय ग? अशा ह्या तयारीनं जोगवा मागायला कुठं निघालीस?

**नीरा**—जोगवा नाहीं हा. देवळांत चालली आहें मी.

**सुंदर०**—कुठं? दोन देवळांकडं?

**नीरा**—नाहीं हो, इथल्याच मारुतीला.

**सुंदर०**—कोणच्या? त्या कांदेवाडींतल्या मारुतीला कां? वा:! मग उत्तम! तो ब्रह्मचारी अन् तुम्हीं अखंडकुमारिका! पण काय ग ए, तेवढ्याच त्या मारुतीला तेल्याच्या घाण्याप्रमाणं तरुणांच्या अन् तुमच्या प्रदक्षिणांचे विळखे अहोरात्र बसतात, अशा त्या मारुतींत कोणता जाज्वल्यपणा मुरला भरला आहे?

**नीरा**—छे:, भलतंच! बरंच विनोदी पण लाक्षणिक बोलतां हो तुम्ही! तें असो; पण त्यावर पुन्हां नाहीं आलांत आपण?

**सुंद०**—आलं होतं ग मनांत; पण आमच्या त्या माधवराव फक्कडांचाच पत्ता नव्हता.

**नीरा**—काय? आपल्याकडंहि नाहीं आले ते?

**सुंद०**—अग मला वाटलं, कीं त्याची बैठक तुझ्याकडंच असेल!

**नीरा**—छे:, नाहीं. कांहीं दिवसांपूर्वीं माझ्याकडं येऊन माझी हिऱ्याची चमकी दुरुस्त करायला गेले त्या दिवसापासून त्यांचा पत्ताच नाहीं.

**सुंदर०**—औं! ह्याहि करामती आहेत कां त्याच्या आंगीं?

**नीरा**—घर तुमचंच आहे; या आपण केव्हां तरी. येतें मी (जातें.)

**सुंदर**—मला एकट्यालाच ठेवून हा गेला कुठं इतका वेळ? सतरा खुंटावरले हे; साऱ्या जगाच्या उठाठेवी करण्याचीं यांचीं कंत्राटं! बाकी कांहीं वेळेला असल्या ह्या मुरलेल्या मोरावळ्यांचा फार उपयोग होत असतो!

**माधव**—( प्रवेश करून ) Excuse me Abasaheb ! त्या गृहस्थांचा चहाचा आग्रह झाला म्हणून लागला थोडा वेळ. शिवाय, नीराचा अणि आपला रंगांत आलेला डायलॉग पाहून उशीरच केला मुद्दाम. आबासाहेब, त्या दिवशींच्या आपल्या त्या प्रकाराबद्दल म्हणाली कां ती कांहीं ?

**सुंदर**—अन् त्या दिवसापासून तुमचंहि जाणं झालं नाहीं वाटतं ?

**माधव**—तसं नाहीं—पण—मला देखील तो प्रकार एकंदरींत वाईटच दिसला. अन् त्या दिवसापासून मीहि तिच्या घराची पायरी चढलों नाहीं.

**सुंदर०**—अस्सं ! तुम्हाला देखील बरंच वाईट वाटलं !

**माधव०**—हें पहा, मी उद्यां येईन त्या वेळीं बोलेन एका कामासंबधीं. गुड् बाय. (जातो.)

**सुंदर०**—हं ! बरींच त्रांगडीं दिसतात या फक्कडरावांचीं ! नाहीं; पण इतक्यांतच गैरसमज करून घेणं बरं नाहीं. बोलूनचालून या नगरभवान्या ! यांच्या बोलण्यावर विश्वास कितपत ठेवावा हा देखील प्रश्नच आहे. काय म्हणाली ती ? 'या आपण केव्हांतरी'. तें कांहीं असो; पण पात्र मात्र मारू आहे यांत शंकाच नाहीं ! स्मशानसान्निधालाहि मोह आवरायचा नाहीं हिचा !

पद १०

**विषय सुखाला मोहुनी घाला । जीव निमाला तोषवि आतां ॥ धृ० ॥ हौस मनाला या विलासा । वासना सुफला कराया । पाहीं अजि मी सुख–वश्य–गणिका ॥ १ ॥**

---

## प्रवेश ३ रा

[ **स्थळः—**वत्सलेचें घर. **कृष्णा** हॉलमध्यें बसाला आहे; वतमानपत्र घेऊन आकडा पहातो. ]

**कृष्णा**—गेला ! आजचा पण चान्स गेला नि आकडा हुकला ! नशीब दुसरं काय ! फुटकं मडकं नि माझं डोचकं सारखंच ! या घरांत सगळ्यांना कंटाळा आला आहे; पण अडचण होईल माझी. मुंबईची वस्ती; जेवणाची नाहीं तरी निजण्याची सोय लागली नाहीं, कीं आमचा संसार फुटपाथवर ! आज इकडचं तुटलं तर उद्यां दुसरीकडं जोडलं. बाजारहाट करणं, चिठ्या पत्रं नेणं व घरांत एक सोबत राहणं, एवढ्या मजुरीला आम्हाला कोठेंहि राहतां येतें. आमच्या गांववालींचे धंदे चालले आहेत तोंपर्यंत आम्हाला काळजी नाहीं. शिवय, दुसरा खर्च सोडण्याला असे हे छक्केपंजे आहेतच.

[ **वत्सला** येते. ]

**वत्सला**—रे कृष्णा, सांगितलंस कां तिला ?

**कृष्णा**—हो बायजी.

**वत्सला**—काय बोलली ती ?

**कृष्णा**—बायजी, तुझं ती ऐकेल असं नाहीं दिसत. सतीशाचं तिला पक्कंच वेड लागलंय.

**वत्सला**—बरं, तुला सांगितलेलं काम करून लवकर परत ये. [ कृष्णा जातो. ] छेः, पोरीची आशा करण्यांत आतां अर्थ नाहीं.

पद ११

**गमत विफल अजि मनास आशा । प्रसंग**
**साशंकशा काला ॥ धृ० ॥ सुजाण बाळी कुणा**
**जुमानी ? । धांवत येई अनंग आतां ॥ १ ॥**

सतीशानं तरी तिला लग्नाचं वचन खरोखर दिलं असेल कां ? पण याचा विचार कशाला ? ( दारावर आवाज होतो. ) विचार करण्याच्या वेळींच कोण आलं त्रास द्यायला हें ? या सोळभोकांना कांहीं धंदे आहेत कीं नाहींत ? ( दार उघडते ) या हो आंत.

( सतीश येतो. )

**सतीश**—श्रीरंग आहे कां घरांत ?

**वत्सला**—नुकताच तो बाहेर गेला. पण तो नसला म्हणून घटकाभर बसायला तुम्हाला परकेपणा वाटतो ?

**सतीश**—तसं नाहीं; पण श्रीरंग असता, तर गप्पा मारीत बसलों असतों थोडा वेळ. त्याला सांगा, कीं मी येऊन गेलों; जातों मी.

**वत्सला**—माझं कांहीं काम आहे; थांबाल कां थोडा वेळ ?

**सतीश**—तुमचं कामच असलं तर थांबेन. कसलं काम आहे ?

**वत्सला**—तुम्हीं थोडावेळ बसावं म्हणून एक निमित्त काढलं. हें पहा सतीश, मझ्या विचारण्याचा राग नाहीं ना येणार ?

**सतीश**—राग ? रागावतांना मला कधीं पाहिला आहे कां तुम्ही ? खुशाल विचारा.

**वत्स०**—तुमच्या लग्नाचे लाडू कधीं देणार ?

**सतीश**—कुणी सांगितलं तुम्हाला माझं लग्न आहे म्हणून ?

**वत्स०**—लगीनच करणार नाहीं तुम्हीं ?

**सतीश**—तुमचं कांहीं काम आहे म्हणून मला बसवलत; अन् लग्नाबद्दल विचारतां याचा अर्थ कळत नाहीं मला.

**वत्सला**—राग नका मानू. तसं कांहींच नाहीं. पण आईबापांसमक्ष तुमचे दोनाचे चार हात झाले तर बरं होईल.

**सतीश**—तुम्हाला तें बरं दिसेल; पण मला तें नको आहे.

**वत्सला**—म्हणजे लगीनच करणार नाहीं ?

**सतीश**—तसं नव्हे; लग्नाचे चालू प्रकार मला आवडत नाहींत.

**वत्स०**—म्हणजे मिश्रविवाह का करणार ?

**सती०**—नाहीं. जन्माची जोडीदारीण पतकरणार आहें मी.

**वत्स०**—पण सतीश, ती कुमारिकाच पसंत कराल ना ?

**सती०**—जोडीदारिणीची निवड करण्यांत मी कांहींच भेद मानीत नाहीं.

**वत्स०**—पण तुमचे हे विचार तुमच्या वडिलांना पसंत पडतील ?

**सती०**—तो प्रश्न माझा आहे. बरं, आणखिन् आहे कां आपलं कांहीं काम ?

**वत्स०**—काम नव्हतं तसं. पण मला एकटीला घरांत वेळ जात नव्हता म्हणून सहज बसवलं. अन् बोलायचंच कांहीं तरी म्हणून लग्नाची गोष्ट काढली. रागावूं नका हं सतीश. ( दारावर आवाज; वत्सला दार उघडते; **सुशिला** येते; वत्सला आंत जाते. )

**सुशिला**—हॅलो ! बराच वेळ थांबावं लागलं वाटतं ? वेळेवर याल म्हणून वाट पाहिली नि गेल्यें मग बाहेर.

**सती०**—तुझी काय मजा आहे आजकाल.

**सु०**—कां ? तुम्ही चुकलांत म्हणून वाटतं ?

**सती०**—मला सोबत असली काय अन् नसली काय, दोन्हीं गोष्टी सारख्या. जन्माला येतेवेळीं ब्रह्मदेवाकडनं जो ' **Magna Charta** ' घेऊन आलों, त्यांत विशेष अशीं कलमचं नव्हतीं; अगदीं कोरा करकरीत होता तो. पण माझ्या वाढत्या वयाच्या वाढत्या व्यवहारांनीं आतांशा मात्र तो विविध रंगांनीं रंगूं लागला आहे.

**सु०**—पण याचा कांहीं अर्थच कळत नाहीं गडे. हा बादरायणसंबंध तरी कोणत्या अर्थानं ?

**सती०**—शेले, बायरन्, टेनिसन् या कवींच्या काव्यांत नाहीं आढळला अर्थ ?

सु०—हें पहा, मला किनई असं हें बोलून खिजवूं नका हं उगाच.

सती०--पण यांत मी बोललों काय असं ?

सु०--आठवण निघाली, कीं मला त्या बायरन्‌चा तिटकारा येतो.

सती—कां ? मठांतील जोगिणींच्या नीतिमत्तेचा भोपळा चव्हाठयावर फोडणारा त्याचा तो ' Don Juon ' हिरो आवडत नाहीं वाटतं तुला ?

सुशिला—नको, मला कांहीं नको. तुम्ही हा काव्यशास्त्रविनोदाचा विषयच बंद काराल तर बसेन मी थोडा वेळ.

सतीश—मग कोणता विषय आवडतो तुला ? विषयाचा विषय ? ( त्याच्या तोंडावर हात धरते ) अग पण मग काय हवं तुला ?

सुशिला—मला हवं, तें येईल कां देतां ?

सतीश—मला स्पष्ट कळल्याशिवाय मी हो कसं म्हणूं ?

सुशिला—इतका खोल विचार करण्यासारखी ती गोष्ट नाहीं. मग म्हणा ना हो म्हणून.

सतीश—सुशा, तारुण्याच्या उन्मादानं डवरलेल्या तुझ्यासारख्या तरुणीसमोर रात्रंदिवस बसण्याची नि मोकळेपणानं वागण्याची संधि मिळाल्यामुळं होला हो म्हणणारा मी एखादा लंपट तरुण नव्हे.

सुशिला—मी सांगणार आहे ती गोष्ट साधी आहे. आपण सहज होकार देऊं शकाल. विचाराचा प्रश्नच नाहीं मुळीं. मग म्हणाना हो म्हणून.

सतीश—अं हं ! तसं नाहीं. आधीं प्रश्न नंतर उत्तर.

सुशिला—तुम्ही किनई आज माझी थट्टा करण्याचा निश्चय केलेला दिसतोय.

सतीश--तुला थट्टा वाटत असेल तर खुशाल तसं समज.

सुशिला—तुम्ही हें सारं serious च बोलतां ना ? तर मग मीच सांगत्यें तो विषय.

सतीश--हं, आतां ठीक झालं. अशी व्यवस्थितपणानं बोललीस तर तुझं सारं हितगुज ऐकायला मी तयार आहे. कॉलेजांत शिकलेल्या Logic चा व्यवहारांत कांहींसा उपयोग करीत जा.

सु०--अस्सं ! असं विचारते, कीं आपल्या विवाहाची तयारी केव्हां करायची ?

सतीश—कुणाच्या ? तुझ्या कीं माझ्या ?

सुशिला—आपल्या म्हणत्यें ना मी ?

सतीश--माझ्या सोयरिकेची अजून तरी सोय झालेली नाही; तूं स्वतःला स्थळ पाहिलं असशील तर ठीकच आहे.

सु०--म्हणजे याचा अर्थ ?

सतीश--याचा अर्थ अगदीं स्पष्ट नि सरळ आहे. कळला नाहीं तुला ?

सु०—म्हणजे ? तुम्ही माझा स्वीकार नाहीं करणार ? माझी तुम्ही निराशा कां करणार ?

सतीश--तुझा स्वीकार नि तुझी निराशा ! वाः ! ! अग सारेच तरुण तरुणी एकत्र वावरल्यानं त्यांच्या त्या मैत्रीचा व प्रेमाचा शेवट जन्माच्या गाठींत होतो—नव्हे, झाला पाहिजे--ही तुझी समजूत मला तरी वेडेपणाची दिसते.

सु०—सतीश, अशा तऱ्हेनं बोलून तुम्हीं मला दगा देत आहांत याचा तुम्हीं कांहीं विचार तरी केलांत कां ?

सती—तूं स्वतःच एकटीनं आपल्या मनाशीं वाङ्‌निश्चय ठरवलेस, या तुझ्या मनोराज्याला जबाबदार तूं कां मी ? असं समज, कीं मी तुझ्याविषयीं आपल्या मनांत कांहीं ठरवलं असंत; पण तुझ्या पसंतीचं क्षेत्र निराळं असतं, तर माझी स्थिति काय झाली असती ? “ तूं माझ्या योजनेचें मनोरे कोसळून टाकलेस ” असं मी तुला म्हणालों असतों तर त्यावर तूं मला कोणतं उत्तर दिलं असतंस ?

सु०—एकूण, मी होऊन स्वतःलाच फसवलं असंच ना ?

**सती०**—अगदीं अक्षरशः ! या बाबत माझ्या संमतीशिवाय, जी कल्पना तूं आपल्या मनाशीं बांधली आहेस, ती तुला दगाच काय पण अन्तीं तुझा गळाहि कापल्याशिवाय राहणार नाहीं. मग उगाच भलत्याच मार्गाचा अवलंब कां बरं करतेस ?

**सु०**—म्हणजे ? विवाहविधीच्या बंधनाशिवाय तुमच्याशीं संसार थाट-णारी सहचारिणी निवडणार आहांत तुम्ही ? असल्या प्रकारानं वागायला आजची कोणती तरुणी कबूल होईल ?

**सती०**—जिची तयारी असेल ती होईल कबूल. विवाहविधीच्या तत्त्वाला तूं सर्वस्वी बळी पडल्यामुळं तो मार्ग स्वीकारणं तुला शक्य नाहीं. म्हणून म्हणतों, नादानपणानं तूं आपल्या विचाराचं सुकाणूं भलतीकडं फिर-वून आपल्या जीवननौकेला अविचाराच्या खडकावर आपटूं नकोस; तें तुला पश्चात्तापाला नि नाशाला कारण होईल. आयुष्याच्या जबाबदारीची जाणीव ठेऊन, योग्य दिशेनं गेलीस, तर त्यांत तुझं कल्याण होईल. सुशा, अविचारानं वागूं नकोस इतकंच ध्यानांत ठेव. ( जातो. )

( **वत्सला** येते. )

**वत्स०**—आतां उघडले कां डोळे ? कीं मला जबाब देणारं तुझं तोंडच बंद झालं ? कां बोलत नाहींस आतां ? सतीशाच्या मागं लागून झालं कां सार्थक ? आकाश दोन बोटं उरलं होतं ना तुला ?

**सु०**—खरं आहे. पण सुशिक्षित वेश्या म्हणून मी जगात मिरवावं असंच ना तुझं म्हणणं ?

**वत्सला**- अग मी थोडसं शिकलेंसवरलें म्हणून एखाद्याची बायको होण्याचा हट्ट धरला कां ? या पुढं तुला माझ्या सांगण्याप्रमाणं वागायचं नसेल, तर उद्यांपासून चारी वाटा तुला मोकळ्या आहेत. ज्याचं तुला इतके दिवस वेड लागलं होतं त्यानंच उलट तुझ्या डोळ्यांत उजेड पाडला! अजून तुला नीट वागायचं असलं तर पहा. ( जाते. )

**सुशिला**--अविचार ! खरंच अविचार का माझा ? विधीशिवाय मी सतीशांबरोबर संसार थाटायला तयार झालें, तर माझ्या बहिणींत नि माझ्यांत फरक कोणता राहील ? तिच्या सांगण्याप्रमाणं एका यजमानाशीं संबंध ठेवणं किंवा सतीशाबरोबर विधीशिवाय राहणं ह्या दोन्ही गोष्टी सारख्याच नव्हत कां ? मग वेश्यांना दोष तरी कां बरं द्यावां ? अशा प्रकारानं थाटलेल्या संसाराला आजचे लोक काय म्हणतील ? अधिक शिक्षणाच्या नादीं न लागतां, यापूर्वींच मी धंद्यांत पडतें तर बरं नसतं कां झालं ? हो, पण शिक्षण आमच्या मूळ धंद्याच्या आड येतं, ही विचारसरणी बरोबर नाहीं. पूर्वींच्या आमच्या बाया; त्यांना कुठं अक्षरओळख होती ? आमच्या आधींची पिढी थोडीच शिकली; मी तर आतां इंग्रजी शिकलेली; ह्मणून मी आमच्या धंद्यांत पडूं नये कां ? आमचा धंदा नि शिक्षण यांचा भलताच संबंध जोडणं चूक नाहीं कां ठरणार ? तसं करणं चूकहि ठरेल ! पण बहुजनसमाजाचं अनुकरण करण्याची वृत्ति जोंपर्यंत आमच्यांत जिवंत आहे, तोंपर्यंत असल्या गोष्टींचा माझ्यासारखीनं विचार करून काय निष्पन्न होणार ? माझ्या तरुण भगिनींनों ! विलासप्रिय स्त्रियानों ! मी तुमच्याशीं कोणत्या तोंडानं बोलूं ? ज्या तोंडानं बोलणार त्यावरला तजेला पार झडून गेला ! माझं तोंड काळं ठिक्कर पडलं ! भावी पति म्हणून ज्याच्या संगतींत अहोरात्र बसल्यें, उठल्यें, त्यानं अखेर निराशेच्या खोल दरींत मला फेंकून दिलं !—नाहीं. मीच, मीच स्वतः स्वतःला फसवून घेतलं ! वडिलधाऱ्या माणसांच्या वर्चस्वाखालीं सांपडलेल्या माझ्यासारख्या परावलंबी अशा अविवाहित तरुणी आपल्या बऱ्यावाईटाचा विचार करणार नाहींत, एखाद्याच्या बाहेरील देखाव्यावर भाळून त्याची अभिलाषा धरण्याचा मोह आवरणार नाहींत, त्यांना माझ्यासारखा कटु अनुभव आल्याशिवाय राहणार नाहीं. दगा, अंतीं सर्वस्वी दगा ! हा माझा सावधगिरीचा इषारा. पण हो, सतीशांच्या मताप्रमाणं मी तयार झाल्यें, तर—तर त्यांची प्राप्ति होईल मला ? होईल; पण ती विधीशिवाय ! छे; हें मला तरी पसंत नाहीं. स्त्रीनं विधीशिवाय संसार थाटला, तर पुरुष तिला आजन्म सांभा-

ळील याची शाश्वती तरी काय ? पुरुषांवर पूर्ण विश्वास ठेवायला आम्हां स्त्रियांना तरी आधार कसला ? नाहीं, नाहीं; सब् झूट; सगळा ढोंगीपणा ! ( कोचावर थोडावेळ मान टेकते ) Hypocrisy ! A regular hypocrisy ( हसते. )—" सुशा ध्यानांत ठेव; योग्य दिशा; तुझं कल्याण; अविचारानं वागणं. "—कलावन्तीण, कुलस्त्री,—वेश्या, वधू, –काय?–सतीश ? सतीश, फसवणार मला ? सतीश बोला ना; तुम्ही दगा देणार मला ?—गळा ? तुम्हीं गळा कापता माझा ? का ? बोला. नाहीं बोलत ?—काय ?—लाथ ? लाथ उगारतां माझ्यावर ? ( हंसते ) लाथ ! माझ्यावर, कीं या मेलेल्या समाजावर ?

समाज झाला खिळखिळा ।
　　बनला त्याचा खुळखुळा ॥
पोरें वाजविती खळखळा ।
　　कुमारी रडती ढळढळा ॥
रूढीचा बसला पगडा ।
　　करुणापाझर फुटला दगडां ॥
वेश्या—वधूंचा जमला झगडा ।
　　लग्नविधीवरी पाणी सोडा ! ॥

**वत्स०**—काय ग सुशीले, अजून नाहीं डोळे उघडत तुझे ? आं ! हें काय पहात्यें मी ! ही असले चाळे काय करूं लागली !

( वत्सलेकडे पाहून )

**सुशिला**—माझी करुणा वाणी । ऐकुन ती कानीं ।
दिव्य देवता कुणी । स्वर्गभुवना त्यागोनी । आली या स्थानीं ॥

(वत्सलेला सतीश समजून तिच्या आंगाला बिलगूं पहाते. मागील गाणें शब्द तोडून म्हणते. शेवटली ओळ झपाट्यानें म्हणून वेडाच्या भरांत निघून जाते. )　　[ पडदा. ]

**अंक दुसरा समाप्त.**

# अंक तिसरा

## प्रवेश पहिला

[ **स्थळः**—सुंदररावाचें घर; **यमुना** बसली आहे. ]

**यमुना**—माझा सतीश किती विनयशील, किती विचारी; पण त्याच्या बुद्धीला कोणची वाळवी लागली आहे ती एक देव जाणे. वास्तविक यानं आतां संसाराचा भार आपल्या शिरावर घेऊन आम्हाला सुख द्यायचं; पण तें सारं दूर राहून याचे विचार भलतेच ! इकडलं स्वतःचं वर्तन तरी कांहीं धड ? तेंहि नाहीं ! म्हणतात ना नांव मोठं नि लक्षण खोट, तशांतला सारा प्रकार ! खाण तशी माती ! मग मुलाकडं तरी काय बरं दोष ?

( **सुंदरराव** येतो. )

**सुंदरराव**—काय ? मुलाच्या अपराधांवर पांघरूण घालतेस ? वाः ! तुझ्यासारख्या आया पाहिल्या, कीं मातृ-दिन साजरा करणाऱ्या सुपुत्रांचीं श्राद्धंच घालावींत असं वाटतं ! आपल्या चिरंजिवाच्या करामती नाहीं कळल्या अजून तुला. अग, साऱ्या मुंबईत दिवे लावून नुकतीच त्यानं दिवाळी साजरा केली समजलीस ?

**यमुना**—समजल्यें ! तो दिवाळी साजरी करतोय म्हणून तुम्ही शिमगा कां साजरा करतां ? तो मेला माधवराव —

**सुंदर०**—चूप; खबरदार त्याचं नांव घेतलंस तर. कुणाला तूं हें ऐकवतेस ? मला ? या would-be रावसाहेबाला ? माझा अपमान ? काय ग, तूं आर्य-स्त्री आहेस, कीं एखादी वेसवा आहेस ? चल जा आंत. ए, सतीशला पाठवून दे. ( ती जाते, व **सतीश** येतो. )

**सतीश**—मला बोलावलंत आपण ?

**सुंदर**—हो. हें पहा, तूं विचारी मुलगा आहेस; तुला कांहीं मला सांगायचं आहे.

**सती०**—काय ह्मणणं आहे आपलं आबासाहेब ?

**सुंदर**—'**टीकाकार**' पत्राच्या मागील अंकांत "**विवाहसंस्थेची धोंड**" या हेडींगखालीं लेख लिहून तूं आपल्या मतांचं जें प्रदर्शन केलं आहेस त्याचा हेतू रे काय ?

**सती०**—त्याचा हेतू इतकाच, कीं माझे विचार मी स्पष्टपणानं मांडले.

**सुंदर**—अरे पण मूर्खा, तुला इतकं कळूं नये, कीं तुझं अजून लग्न व्हायचं आहे; अन् तूं जर अशा तऱ्हेचीं मतं प्रतिपादन करूं लागलास, तर कोणता गृहस्थ तुझ्या लग्नाच्या भानगडींत पडेल बरं ? माझ्या कांहीं स्नेही मंडळींनीं तुझा तो लेख वाचला; त्यांच्या प्रश्नांना मला कांहीं उत्तर देतां येईना. शरमेनं मला मान खालीं घालावी लागली !

**सती०**—आबासाहेब, विवाह उरकून घेतल्यावर विवाहसंस्थेवर टीका करीत बसणं म्हणजे मतलब पदरांत पाडून घेतल्यावर तत्त्वाचा प्रचार करणाऱ्यांपैकीं मी नव्हे.

**सुंद०**—पण तूं इतका वाढलेला मुलगा अशा तऱ्हेनं वागूं लागलास तर मला बाहेर तोंड तरी दाखवतां येईल कां ?

**स०**—स्वतःला पटणाऱ्या गोष्टींच्या बाबतींत इतरांच्या मतांच्या मापांचा उपयोग करणं मला आवडत नाहीं.

**सुं०**—माझं लग्न अशा तऱ्हेनं कां झालं ? घराण्याचा लौकिक कायम राखून चारचौघांसारखंच मला तें उरकावं लागलं. अन् त्याच आह्मा पति-पत्नींच्या पोटीं तूं जन्मलास ! याची तरी तुला कांहीं जाणीव ?

**स०**—आबासाहेब मला जाणीव आहे. पण जुन्या चकारींत घुटमळणारी विवाहपद्धत आज अत्यंत नादुरुस्त झाली आहे. तिच्यांत सुधारणा होणं आवश्यक आहे ह्मणूनच तीवर मी कोरडे ओढले.

**सुं०**—तुझ्या डोक्यांत नवमताचं वारं शिरलंय, कीं आंगांत रशिया संचारलाय ?

**स०**—आबासाहेब, माझ्या डोक्यांत सत्याचं खूळ शिरलंय.

**सुंदर**—हा एक तुझा मुद्दा सोडला, तरी स्त्री-पुरुषांच्या व्यवहारांत स्वैराचार असावा असंहि तूं त्या लेखांत लिहिलं आहेस.

**सती**—तें तत्त्वज्ञान माझं स्वतःचं नव्हे. महाभारतांत श्वेतकेतूनं दंडक घालून देण्यापूर्वी स्त्री-पुरुषांना स्वेच्छाचाराची पूर्ण मोकळीक होती; अन् असल्याच आधारानं माझ्या लेखांत मीं दोन गोष्टी स्पष्ट केल्या.

**सुंदर०**—म्हणजे व्यभिचाराचे समान हक्क साऱ्या स्त्री-पुरुषांना मिळवून देण्याचा तूं विडा उचललेला आहेस, असंच ना ?

**सती०**—आपण वाटेल तें समजा. पण माझा मात्र तसा हेतू नाहीं.

**सुंदर०**—मग वेश्यांत अन् विवाहित स्त्रियांत फरक तो कोणता रे बाबा ?

**सती०**-तुम्ही ज्याला पवित्र विवाह समजतां त्यालाच मीं **Mutual Contract** व **Licensed Prostitution** असं समजतों.

**सुंदर०**-बरोबरच आहे. अहोरात्र त्या रांडांच्या गोतावळ्यांत पडल्या-मुळं तुझं असलं हें तत्त्वज्ञान बाहेर पडणं योग्यच आहे ! इतरांचं तत्त्वज्ञान तुला कसं पटायचं बाबा ?

**सती०**—आबासाहेब, केवळ गैरसमजामुळं आपण मजवर भलते आरोप करीत आहांत. मी त्या गोतावळ्यांत पवित्र मनानं वावरलेला लोकांना पसंत नाहीं; पण तसल्याच ठिकाणचं पावित्र्य मलिन करणाऱ्या सभावितांना कुणी काय म्हणावं तेंच कळत नाहीं मला. आहे कां असल्या प्रकारांना एखादी शिक्षा ?

**सुंदर०**—म्हणजे ? वेश्यांनाहि तूं पवित्र मानूं लागलास अं ? ठीक, ठीक.

**सती०**—आबासाहेब, एखाद्या शहरांतला प्रश्न नव्हे. ज्यांना तुम्हीं अकुलीन मानतां, त्या कलावन्तीणींचा दर्जा प्राचीन कालीं अत्यंत उच्च होता.

**सुंद०**—वाः ! छान प्रतिपादन केलंस ! There you are !

**सती०**—पूर्वी ग्रीस देशांत देखील Courtesaus ह्या म्हणजेच कलावन्तीणींच्या घरीं कवी, लेखक नि तत्त्वज्ञ यांच्या अहर्निश बैठकी होत असत. त्या बैठकींत मोठमोठ्या प्रश्नांवर चर्चा होई. पण या सर्व प्रकाराकडे त्यावेळचा समाज देखील मोठ्या आदरानं पाही.

**सुंदर**—अरे, ही झाली पाश्चात्यांची गोष्ट; पण आपल्याकड होते का असले प्रकार ?

**सती०**—हो; कालिदास–भासाच्या कालीं होते इतकंच नव्हे, तर ब्रह्मर्षि गालवाची बहीण एका राजाजवळ पुत्र होईपर्यंत राहिली, नि त्या राजाकडून गालवानं दोनशें गाई घेतल्या, असं आपलं महाभारत सांगतं ! उच्च वर्गातील स्त्रिया देखील '**वारांगना**' होत; त्यांचा दर्जा उच्च असे. व्यवहारज्ञानाच्या प्राप्तीकरतां वारांगनेचा सहवास करावा असं राजा भर्तृहरी देखील सांगत असे.

**सुं०**—म्हणजे कुलवधू नि कलावन्तीण ह्या तुझ्या दृष्टीनं एकाच योग्यतेच्या असंच ना ?

**सती०**—अर्थात्. सनातन तत्त्वाच्या दृष्टीनं दोघींचाहि दर्जा सारखाच–

**सुं०**—ह्मणून विवाहाला देखील ती कलावन्तीण Cent per cent ( शंभर टक्के ) लायकच अं ?

**सती०**—अर्थात्. तिचा नैतिक दर्जा हीन आहे असं मला तरी वाटत नाहीं; पण घटकाभर तसंहि धरून चाललं तरी त्याला कारण आपला समाजच आहे. आबासाहेब, आपला गैरसमज होत नसेल, तर मी स्पष्टच ह्मणेन, कीं ज्यांना आपण हीन दर्जाचे समजतों त्यांच्याशीं संबंध ठेवण्यांत नि त्यांची सुधारणा करण्यांत माणुसकीची कर्तव्यता पूर्ण होत असते.

**सुं०**—काय रे शहाण्या, मला हा तुझा वेदान्त पढवण्यापेक्षां स्पष्ट सांग, कीं तूं या पुढं स्वैराचारानं वागणार आहेस ? त्या रावसाहेबांची मुलगी नाकारून वेश्येच्या पोरीबरोबर कां लग्न करणार ?

**सती०**—कोरडा वेदान्त सांगून समाजांतील शिष्टांत मिरवण्याला मी हपापलें नाहीं. ज्या वेळीं जें करणं योग्य दिसेल त्या वेळीं तें केल्याशिवाय मी रहाणार नाहीं.

( **रमाकांत** येतो. त्याच्या मागून **यमुना** येते. )

**रमा०**—सतीश—

**सुंद**—काय रे रमाकांत, हें तुम्हीं मांडलंय तरी काय ?

**रमा०**—आबासाहेब, आम्हीं कांहीं दुकान मांडलं नाहीं. मला अत्यन्त वाईट वाटतं तें हेंच, कीं तुमच्या या बुद्धिमान् चिरंजीवाचं नुकतंच बाहेर पडलेलं सारं तत्त्वज्ञान जळून खाक झालं !

**सुंद०**—तरी वाटलंच मला, कीं आतांच्या ह्या टवाळ नि उन्मत्त तरुणांच्या स्वैर विचारांची होळीच व्हायची ! माझी एवढी हयात गेली; आमच्या घराण्यांतलि मागल्या डझनभर पिढ्यांचा इतिहास देखील आज जिवंत आहे; पण तुमच्यासारख्या कालच्या मंडळींच्या विचारांना आमच्या घराण्याकडून किंवा समाजाकडून थाराच मिळाला नाहीं समजलास ?

**रमा०**—अगदीं समजलों.

**सुंद०**—मी तरी तेंच म्हणतों.

**रमा**—'आपल्या पायथ्याशीं घाण । लोकां सांगे ब्रह्मज्ञान ' ॥

**सुंदर**—अगदी सत्रा आणे बोललास ! याला म्हणतात विचारी मुलगा. नाहीं तर आमचे हे—

**रमाकांत**—आबासाहेब, आतां तुमचे हे पार मोकळे झालेत.

**सुंदर**—म्हणजे ? मी नाही समजलों.

**रमा**—सतीश, बाहेर चल.

**सती०**—काय झालं ?

**रमा**—वेडाच्या भरांत सुशिलेनं आत्महत्या केली.

**सती०**—कुठं ? केव्हां ?

**रमा**—तूं बाहेर चल आधीं. ( दोघे जातात. )

**यमुना**—छाऽऽन झालं ! त्या कवटाळणीच्या मिठींतून माझा हिरा मोकळा झाला !

**सुंदर**—अग जरा आवरून धर; नाहीं तर हर्षवायूच्या झटक्यानं सोनापूर गांठशील ! ( वेडावून ) म्हणे ' माझा हिरा मोकळा झाला '! अग मोकळा झाला खरा, पण त्याला आतां नवे पैलू पाडायला हवेत समजलीस ?

पद १२

**वैताग हा जाहला। नच मात्र साहे चिंता मनाला ॥ धृ० ॥ वदतां मुखांनीं कां सौख्य लाभे ? । मतिला अतां वाव कुठला असा या ? ॥१॥**

**यमुना**—तुह्माला आहे कां कांहीं ? पण मला आत्तां त्याच्या लग्नाच्या तयारीला लागलं पाहिजे.

**सुं०**—वा: ! सासूबाईचं वारं नाहीं ना संचारलं तुझ्या आंगांत ?

**यमुना**—तुह्मी नाहीं वाटतं सासरे होणार ?

**सुं०**—पण उतावीळपणानं तुझ्या इतका मी आत्ताच दीड पायावर उड्या नाहीं लागलों ! वा: ग तुझी हौस ! !




सुंदरराव:—वा: ग तुझी हौस !! ( पृ. ५६ )

## प्रवेश २ रा

[ **स्थळः**—बगीचा. **सतीश** व **रमाकांत** येतात; इतक्यांत **श्रीरंग**हि येतो. ]

**रमाकांत**—अरे हा आलाच कीं.

**श्रीरंग**—सतीश, विधिघटनेनं होणाऱ्या गोष्टी अडवून धरणं माणसाच्या हातीं नाहीं. माझी बहीण वारली याबद्दल मला वाईट वाटणं साहजिक आहे; पण तुझी भावी सहचारिणी —

**सती०**—नाही, चुकलास तूं. ती माझीहि बहीण होती.

**रमा०**—तुझा लग्न फसला म्हणून तूं हें असं बोलत असशील.

**स०**—दोघेहि तुम्ही वेडे आहांत. अशा तऱ्हेचा हेतू माझ्या मनांत असता, तर मला तो सहज पूर्ण करतां आला असता. तरुणीच्या सहवासांत अहोरात्र वावरणारा प्रत्येक तरुण तिला आपली सहचारिणी समजत असतो, या तुमच्या कल्पनेला मी तरी अपवाद आहें.

**रमा०**—अरे पण गंमत अशी, कीं तुझ्या ध्येयाच्या पूर्णतेसाठीं सुशाच्या सभोंवारचं क्षेत्र तुला अधिक मोकळं होतं.

**स०**—मुळींच नाहीं. या बाबतींत तिच्या इच्छेला मी दूर झुगारून दिल्याचं तुला कदाचित् ठाऊक नसेल.

**श्री०**—मग जन्माच्या जोडीदारणीसाठीं तूं कोणता मार्ग आंखला आहेस ?

**सती०**—मी मागंच तुम्हांला म्हणालों होतों, कीं मला प्रचलित विवाह-संस्था मान्य नाहीं. संस्काराशिवाय मला माझा संसार थाटता आला तर पाहीन.

**रमा**——अरे पण सतीश, संस्काराशिवाय तुझ्याबरोबर संसार थाटायला कोण तयार होईल ?

**सती०**—माझ्या मताची जी असेल ती.

**श्री०**—पण हा प्रकार स्वैरसमागमाचा होईल.

**सती०**—ही कल्पना तुझी आहे.

**रमा०**—अरे हा प्रकार म्हणजे एखादी कायमची आश्रयाला ठेवण्यांतलाच झाला !

**सती०**—नाहीं; चुकलास तूं. मी सहवासपूर्ण असा ' विवाह' करणार असल्यामुळं भलत्यासलत्या विधींनां मुळीच थारा देणार नाहीं किंवा त्या जोडीदारिणीच्या शारिरीक पावित्र्याचाहि विचार करणार नाहीं.

**रमा०**—म्हणजे ?

**सती०**—जिच्याबरोबर मला कायमचा सहवास ठेवायचा, तिच्या विधियुक्त झालेल्या पूर्वीच्या शरीरसंबंधाचा मी विचार करणार नाहीं. प्रश्न एवढाच, कीं ज्यावेळीं परस्परांचे विचार जुळतील, त्या वेळींच तिच्याबरोबर संसार थाटायला मी कबूल होईन.

**श्रीरंग**—सतीश, तुझे हे rationalistic views खरोखरच उच्च दर्जाचे आहेत; पण तुझ्या या प्रकारांत नि एखाद्यानं कायमची बंदीची नायकीण ठेवण्यांत कांहींच फरक राहणार नाहीं !

**रमा०**—अरे, trial marriage ची ही सुधारलेली Leather-bound आवृत्ति इतकंच.

**सती०**—तुम्ही हे प्रकार निराळ्या दृष्टीनं पहातां इतकाच काय तो फरक.

**रमा०**—हें रे कसं काय ?

**सती०**—ऐक; आपल्या पांढरपेशा समाजांत एखादीचा पहिला पति वारल्यानंतर त्या स्त्रीच्या लग्नाच्या आवृत्त्यावर आवृत्त्या होतात. समाज त्याला पुनर्विवाह किंवा पाट असं म्हणतो. त्यावेळीं त्या स्त्रीचं पावित्र्या

मलिन होत नाहीं, असं आपलं हिन्दुधर्मशास्त्र स्पष्ट सांगतं; मग एखाद्या नायकिणीनं आपल्या आयुष्यांत एक सुटल्यानंतर दुसरा अशा क्रमानं कांहीं यजमान केले तर त्या नायकिणीचं शारिरीक पावित्र्य मलिन कसं काय होतं? अनीतीचा डांबर तिच्या शिलावर कसा काय फासला जातो? मी तर म्हणतों, कीं आपल्या आयुष्यांतील ध्येयाला चिकटून असणारी नि माणुसकीला हृदयांत थारा देणारी अशा स्त्रीबरोबर कायमचा सहवास ठेवला, तर त्यांत बिघडलं कुठं?

**रमा०**—तूं सांगतोस अशी स्त्री वेश्या असली तरी तुझी हरकत नसेल!

**सती**—तसा योग आला तर पाहीन पुढं कांय करायचं तें. पण उगाच भलते प्रश्न विचारून माझी तुम्हीं कसोटी कां पहातां?

**रमा०**—तसं नव्हे रे. आपलं सहज विचारलं; थट्टाच ती.

**सती०**—तूं थट्टा कर, कीं दुसरं कांहीं कर; पण वायफळ बडबडीचा रुखवत डोकीवर घेऊन नाचणारा तरुण मी नाहीं.

**रमा०**—सतीश, पण मघांपासून तुला उणं अधिक बोलल्याबद्दल तुझ्या या दिल्दार मित्रांना क्षमा कर.

**सती०**—त्यांत कसली क्षमा? चालायचंच असं हें. चला आपण जाऊं या.

---

## प्रवेश ३ रा

[ **स्थळः**—रस्ता **वसंत** इकडे तिकडे पहातो.आंत वाद्यांचा आवाज. ]

**वसं०**—नैसर्गिक इच्छा तृप्त करण्याचा आमचा हा तरुणपणचा काळ. पण आमच्या वडील माणसांना कुठली आली याची जाणीव? अशा वेळीं आम्हीं कांहीं वर्तन केलं तर आम्हीं गाढवांत जमा होतों! चारी बाजूंनीं आमचा तरुणांचा अगदीं कोंडमारा! रस्त्यांतून नजर फिरवीत

चालण्याची देखील आम्हाला पंचाईत ! जरा कुठं पाहिलं तर तरुण मुलींचा विनयभंग होतो ! वाः रे कल्पना ! मुलींकडून आम्हा तरुणांचा विनयभंग मात्र होत नाहीं ! हा काय न्याय ? चला, या मोहल्यांतच कुठं तरी एखाद्या इकाच्या ठिकाणीं जावं हें बरं

( इकडे तिकडे पहातो. **सुंदरराव व माधवराव** येत असलेलें पाहून वसंत चपापतो.)

**माधव०**—काय रे वश्या, तूं रे कुठं इकडे ?

**वसं०**—नाहीं, नाहीं; त्या आमच्या पार्शी इसमाला भेटायचं होतं.

**माधव०**—वाः ! या ठिकाणीं पारशाला भेटायचं होतं अं ? छान !

( वसंत पळ काढतो. )

**सुंद०**—आजकालचीं हीं पोरं काय पण तद्दन थापा मारतात !

**माधव०**—काय म्हणत होतां मघां आपण ?

**सुं०**—अहो नायकिणीची ती कार्टी — सुशिला —

**माधव**—म्हणजे आपल्या चिरंजिवांचं प्रेमपात्र —

**सुं०**—आत्महत्त्या करून मेली !

**माधव०**—छान झालं अगदीं ! नाहीं तर आबासाहेब, तुमच्या अब्रूला ती एक जळूच लागणार होती !

**सुं०**—होय तर ! पण ह्या कार्ट्यांना काय म्हणावं तेंच कळत नाहीं मला.

**माधव**—पाहिलात ना मघांचा तो वश्या; कुठं अन् कशासाठीं हिंडत होता तो ?

**सुं०**—आतांच्या ह्या तरुणांबद्दल बोलण्यांत अर्थच नाहीं.

**माधव०**—स्पष्टच बोलायचं तर असं, कीं आतांच्या तरुणांना बुद्धि-सामर्थ्य नाहीं, शरीरबळ नाहीं, विचार नाहीं, पण आंगांत पहाल तर छाकटपणा भरपूर ! अन् यांच्या भावी सुखासाठीं आम्ही निरनिराळ्या चळवळी करायच्या ! यांची काळजी वाहायची !

**सुं०**—मी म्हणतों, कीं यांचीं काळजं सांभाळण्यापेक्षां यांना खुशाल भीक मागूं द्यावी. सगळ्या बाजींत शिंचे पुरे!

**माधव**—आबासाहेब, तुमच्या आमच्या वेळच्या बाजी नि शौक पुरवले; पण आतांच्या या तरुणांच्या सर्वस्वी दुर्बलतेकडं पाहिलं, कीं मला वामनपंडिताच्या एका श्लोकाची आठवण होतेः—

"कायें रोड त्रिपुच्छकर्ण दुबळें पोटाविणें लंगडें ।
अंगीं घाय तयांत पूं आणि किडे हेंही असो थेरडें ॥
ऐसें श्वान चढे शुनीवरि गळा ज्या कांठमोरा असे ।
मेल्यातें स्मर मारितो रगडुनी बेश्वास लज्जा नसे ॥"

**सुं०**—अगदीं खरं म्हणालांत. हें सारं Footpath Prostitution! घाण, घाण! जिकडं पहावं तिकडं सारी घाण! शिव, शिव!!

( इतक्यांत कण्हत असा **विश्वनाथ** येतो. )

**विश्वनाथ**—या माझ्या शरीराच्या घाणीकडं पाहून नाकं मुरडणारे आपण संभावित दिसता मोठे!

**सुं०**— हें काय बुवा नवं लचांड? कोण हा? हं. तूं त्या तात्या बळवंतांचा मुलगा का रे? अरे रे! आमचे तात्या बळवंत म्हणजे जुन्या पिढीचे मोठे अभिमानी! त्यांचा स्वभाव तरी किती करारी! मोठे शौकिन् गृहस्थ! पण स्वतःच्या पैला मात्र कधीं धक्का नाहीं लागूं दिला! त्यांचा तूं मुलगा अन् तुझी अशी ही दशा? थोड्या वर्षांपूर्वी मला भेटलास तेव्हां कसा गोंडस अन् पिळदार दिसत होतास! अन् आतां तुझा हा असा अवतार?

**विश्वनाथ**—आबासाहेब, तुम्ही वडलांसारखेच इभ्रतदार आहांत, सद्वर्तनी आहांत, खऱ्याखोट्याचा विचार करणारे आहांत, म्हणूनच मला खरा प्रकार सांगावा लागत आहे. माझ्या ह्या दशेला भयंकर स्वरूपाचा रोग कारण झाला आहे.

**सुंद०**—अरे पण झालंय तरी काय?

विश्व०—सांगू नये, उच्चारूं नये, माझ्या वाऱ्यालाहि कुणीं उभं राहूं नये, असा शरीराच्या चिंधड्या उडविणारा रोग मला जडला आहे.

सुंद०—आँ!

विश्व०—“ कोटाळी टवळी अतां उमगलों सर्पीण ती चावली !”

सुंद०—काय! तुला महामायेचा प्रसाद मिळाला अं! अरे त्या तात्यांचा तूं हुशार मुलगा इतका कां पराक्रमी निघालास?

विश्व०—नाहीं; आबासाहेब, तसं नाहीं. मला महामायेच्या मंदीरांत दर्शनाला नेणारा एक कुलीन, संभावित होता!

सुंद०—अरे पण स्पष्ट सांग ना.

विश्व०—काय सांगूं? आबासाहेब, काय सांगूं? त्यानं कैक तरुणांना कुमार्गाला लावून आपलं पोट जाळलं, नि आतां त्यानं आपलं जाळं तुमच्यावर पसरलं आहे! इशारा म्हणून म्हणतों, कीं सावध रहा.

सुंद०— सांग, सांग मला त्यांचं नांव; आत्तांच्या आत्तां जाऊन त्याचं नरडं धरतों!

विश्व०—आबासाहेब, तो दुसरा तिसरा कुणी नसून आलिकडं तुमचा उजवा हात बनलेला संभावित ब्रोकर—हेच ते माधवराव फक्कड!

माधव०—काय रे शहाण्या, कुणाचं नांव घेतोस? महत्त्वाचीं कामं आहेत असं सांगून रात्रीं अपरात्रीं घराबाहेर टवाळ तरुणांच्या ताफ्यांत मिरवलास; जिवाची हवी तशी मुंबई केलीस; त्याचीं फळं भोगून, उलट आरोप माझ्यावर करतोस? शरम नाहीं वाटत?

विश्वनाथ—खरं आहे. रस्ता दाखवून पुन्हां आपला नामा निराळा होऊं पहातोस? पहा; पहा. तुझं पुण्य तुलाच तारील! कारण तुझ्या पापाला मात्र खात्रीचा साक्षी–पुरावा नाहीं. बाबा, सुखी रहा.

( कण्हत हळूं हळूं जातो. )

माधव०—हरामखोर, धदांत खोटं म्हणतो! आबासाहेब, आत्तांचीं हीं उरफाट्या काळजाचीं कार्टीं नि कार्ट्या कधीं कुणाच्या अब्रूवर उठतील याचा नेम नाहीं!

**सुंदर**—माधवराव—

**माधव**—म्हणजे त्या कवडी किंमतीच्या पोराच्या म्हणण्यावर विश्वास ठेवतां ?

**सुंदर**—तसं नव्हे; आपली झाकली मूठ सवा लाखाची !

**माधव**—आबासाहेब, मला एक ॲपॉइंटमेन्ट आहे. ( जातो. )

**सुंदर**—बऱ्या बुवा तुम्हाला नेहमींच ॲपॉइंटमेन्ट्स् असतात ! या बुवा ! बरं झालं, हा विषारी सर्प लवकरच दूर झाला ! नाहीं तर माझी भावी रावसाहेबीहि हा गिळून टाकता ! ' दुर्जनं प्रथमं वन्दे ' !

## प्रवेश ४ था।

( **स्थळ**:—बगीचा. **श्रीरंग** येतो. )

**श्रीरंग**—'परस्वाधीन जिणं अन् पुस्तकी विद्या' माणसाला किती गुलाम बनवते याचा अनुभव स्वतः घेतल्याशिवाय कळत नसतो. बहिणीची खप्पा मर्जी व्हायला अन् माझी ग्रहदशा पालटायला एकच वेळ आल्यामुळं आज मात्र मला धन्यता वाटत आहे !

पद १३

**आज मन हंसत हें। मान-पदा अनुतापी**
**प्यारी सारी ! ॥ धृ०॥ हां हां करत ऐसी बंदी**
**सरत ती । कळें ना कां ? तारी माना जी ॥१॥**

( **सतीश** प्रवेश करतो. )

**सतीश**—काय रे श्री, आज इतका अगदीं खुशींतसा दिसतोस ? गोव्याची लॉटरी तर नाहीं ना लागली ?

**श्रीरंग**—सतीश, आज मला दुहेरी आनंद झाला आहे ! मागील आठवड्यांत परीक्षेचा निकाल लागून एकदाचा एल् एल्. बी तर झालों !

**सतीश**—Most heartily I congratulate you !

**श्रीरंग**—Thanks much !

**सतीश**—पण श्री, मला वाईट वाटतं ! तूं कायद्याच्या व्यवहाराची परीक्षा पास झालास; पण व्यवहाराच्या कायद्याच्या कचाटींतून मात्र मोकळा नाहीं झालास अजून.

**श्रीरंग**—म्हणजे ?

**सतीश**—नुसती परीक्षा पास होऊन का कुठं चालतं ? वकिलीची सनद मिळवण्यासाठीं नगद पांचशें रुपयांची हार्ड कॅश जवळ असावी लागते ! आणशील कुठून ती ? बरं, ती एक सोय झाली, तरी इतर ज्युनिअर वकिलांप्रमाणं तूंहि माशा कां मारीत बसणार ? श्री, मी तुझा उत्साहभंग करीत नाहीं; पण जिवाचा सोबती म्हणून विचारतों.

**श्रीरंग**—खरं आहे तुझं म्हणणं; पण मधली भानगड ठाऊक नाहीं तुला. आजच मला एका ठिकाणाहून नोकरीचा कॉल आला आहे. अन् तिच्या आधारावर मी सनद मिळविण्याची तरतूद करणार आहें. स्वतःच्या पायावर उभं राहण्याची पात्रता आंगीं आल्याशिवाय इतर भानगडींत मी पडणार नाहीं. स्वावलंबनाशिवाय वाटेल त्या गप्पा मारणारा किंवा बापकमायीच्या निखाऱ्यावर नवमताचा पापड भाजणारा मी नाहीं. तूं म्हणतोस तितकं व्यवहारज्ञान मला आहे.

**सतीश**—असं असेल तर ठीक. श्री, माझीही मी सोय लावून घेतली.

**श्रीरंग**—कुठं ?

**सती०**—एका स्कूलमधें.

**श्री०**—Good ! बाबा, याचं कारण असं, कीं ज्याला जुन्या परंपरेची होळी करायची असेल, त्या तरुणानं स्वतःची पोळी स्वतः भाजायला तयार असलं पाहिजे. सतीश, त्या ऑफिसांत मला आज लवकर गेलं पाहिजे; अच्छा, Goodbye. ( जातो. )—

( **सुंदरराव** येतो. )

**सुं०**—काय रे बाबा, ती सुटली तरी तो अजून हवाना आहे वाटतं तुला ?




सतीश:—आजच्या विवाहपद्धतीला दूर झुगारून ही ‘ कुलवधू ’ या क्षणापासून माझी जन्माची

**सती०**—आबासाहेब, तुमचा मतलब तरी काय ? हें पहा, या भर चव्हाट्यावर मी तुम्हाला बजावून सांगतों, कीं इतरांप्रमाणें आईबापांच्या जिंदगीवर उड्या मारणारा मी नाहीं. तुमची इस्टेट, तुमची दौलत तुम्हीं हवी त्या महाराला देऊन टाका ! पण तिचा लोभ दाखवून तुमच्या व्यक्तिप्रामाण्याची धोंड मात्र मजवर लादण्याचा यापुढं तुम्हीं मुळींच प्रयत्न करूं नका.

**सुं०**—इतका कां तूं बनलास ?

**सती०**—मी बनलेला अं ? पण तुमच्यासारखा पडद्याआड व्यवहार करून देवपुजेला लागण्याइतका मात्र मी बनलों नाहीं अजून.

**सुं०**—गाढवा, मला बापाला उत्तर करतोस ?

**सतीश**—शुद्ध दांभिक आहांत ! खबरदार ब्र काढाल तर. घरांत आई—लग्नाची एक बायको--होती; ती नीरा — एक धंदेवाईक वेश्या तरी होती; तेंहि असो; पण घरांत कामाला ठेवलेली साधी मोलकरीण, ती सखू— ( इतक्यांत **रमाकांत** येतो. )

**रमा**—वाः शहाणा आहेस मोठा ! चल जा पाहूं तूं आपल्या कामाला. ( सतीशला घालवतो. ) आबासाहेब, तुम्ही तरी त्या पोराच्या नादीं काय लागतां असे ? तरुणपणांतलं गरम रक्त आहे, येईल ठिकाणावर हळूं.

**सुं०**—रमाकांत, या उघड्यावर माझी अब्रू काढतोय; हात चढवायलाहि तयार ! सहज थट्टेनं मी त्या श्रीरंगाचं नांव घेतलं इतकंच;एकदम बिथरला !

**रमा०**—आबासाहेब, तुमचा तो एकुलताएक मुलगा. त्याला तुम्ही विचारस्वातंत्र्याला जागा दिलीत तर तुमचं तरी काय बिघडेल ? आपल्या समाजांत आज असे कितीतरी महत्त्वाकांक्षी तरुण आहेत; पण घरची परिस्थिति अन् घरांतल्या माणसांचं दडपण या खालीं त्यांच्या त्या महत्त्वाकांक्षा नि विवेकवाद पार चिरडून जातात. परमेश्वरानं तुम्हाला ऐश्वर्य दिलं आहे; सतीश देखील स्वतःच्या पायांवर उभा आहे. त्याच्या विचाराला पायबंद घालण्याचा तुम्हाला तरी असा कोणता अधिकार पोचतोय ?

सुं०—माझ्या स्वतःच्या लौकिला नि घराण्याला मी काळिमा लावून घेऊं अं ? वाः छान !

रमा०—हेंच, हेंच मुळीं तुमच्या जुन्या मंडळींचं चुकतं तें ! असं पहा, कीं तुमच्या जुनेपणाचा तुम्हाला मात्र अभिमान असावा; अन् तरुण मंडळीला नवेपणाची कांहींच कां हौस असूं नये ? दुसरी गोष्ट अशी, कीं तुमच्या आधींच्या पिढींतला जुनेपणा तुमच्यांत तरी आज कुठं तंतोतंत राहिला आहे ?

सुं०--हो; तेंहि खरं आहे.

रमा०—मग तुमच्या आचार-विचारांचा बालबोध कित्ता नवी पिढी तरी कसा गिरवणार ?

सुं०—रमाकांत, तूं लहान, पण माझ्या डोक्यांत आज प्रकाश पाडलास याबद्दल मी तुझा आभारी आहे.

रमा०—छेः छेः ! हें काय भलतंच म्हणतां ?

सुं०-- रमाकांत, त्याला भेटून दोन गोष्टी सांग; त्याची समजूत घाल; कांहीं कर; पण आम्हाला टाकून त्याला कायमचा घराबाहेर कुठं जाऊं देऊं नकोस. समजलास बाबा ?

रमा०—आबासाहेब, भिऊं नका; पण तुम्हीहि कांहीं दूरवरचा नि चालू जमान्याचा विचार करा. येतों मी. (जातो.)

सुं०—बदलता काळ लक्षांत घेतां, मी तरी बुद्धिमान् मुलाच्या मार्गांत आड कां यावं ? तो तरी करून करून जगावेगळं असं काय करणार आहे ? त्याच्या विचारांना विरोध करण्याचा मला तरी कोणत्या नीतिनियमानं अधिकार पोहोंचतो ? बरं, तसंहि एकवेळ धरून चाललं, तरी समाजाच्या नीतिमत्तेला आज असा कोणता Standard ( दर्जा ) राहिला आहे ? शास्त्र, रूढि, कायदे यांचा सब्गोलंकार पाहिला म्हणजे आमच्यासारख्यांची बुद्धि मात्र लटपटते, यांत शंका नाहीं ! पण आम्ही तरी काय